






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका



मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष १९ : अंक ४ दिवाळी २००१










अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका



---

**प्रकाशन : त्रैमासिक** (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
**संपादन - समिती :** मृणालिनी शहा (प्रमुख), अशोक रा. केळकर, गं. ना. जोगळेकर, मॅक्सीन बर्नसन, प्र. ना. परांजपे, द. दि. पुंडे, आशा मुंडले, अंजली सोमण, विजया देव, नीलिमा गुंडी
**संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तके :** मृणालिनी शहा, १, शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे, पुणे ४११ ००४. दू. क्र. ५४३३८६९
**व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा :** नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५
**पत्रिकेची वर्गणी, जाहिरातीचे दर :** आवरणपृष्ठ तीन पहा.
**सूचना :** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या / लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.

या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.

---

**संपादक :** मृणालिनी शहा, **प्रकाशक व मुद्रक :** मराठी अभ्यास परिषदेसाठी नीलिमा गुंडी
**मुद्रण स्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२, नवी पेठ, पुणे ४११ ०३०.

## संपादकीय

# भाषिक गोंधळ

ग्रंथालयात अभ्यासाची पुस्तकं शोधत असताना अलीकडील एका महत्त्वाच्या लेखकाचं एक पुस्तक हाताशी आलं. तो ललित लेखसंग्रह होता. सहज म्हणून तो चाळायला सुरुवात केली. त्यातल्या काही ओळींनी माझं लक्ष खेचून घेतलं.

हे लेखक आपल्या मातृभाषेविषयी म्हणजे मराठीविषयी लिहीत होते. त्यांनी लिहिलं होतं, "मी लहान होतो तो काळ मोठा भाग्याचा होता. कारण त्या वेळी आमच्या कानांवर फक्त आमची मातृभाषाच पडत असे. तिच्यावर आम्ही प्रेम करत असू. तिच्याविषयीच्या अभिमानानं आमचा ऊर भरून येत असे. आज ही परिस्थिती पूर्णपणे बदलली आहे."

ही वाक्यं वाचली आणि पटली. आज भाषा शिकणाऱ्या लहान मुलांवर एकाच वेळी दोन-तीन भाषांचे संस्कार होत आहेत. महाराष्ट्रातील शहरांत तरी हीच परिस्थिती आहे. मराठीबरोबर इंग्रजी आणि हिंदी या दोन भाषा 'कॉस्मॉपॉलिटन' शहरांमध्ये भाषा शिकणाऱ्या लहान वयातल्या मुलांच्या कानांवर सतत पडत आहेत.

यावरून मला माझ्या दोन नातींची आठवण झाली. मोठी नात जेव्हा लहान होती तेव्हा माझा मुलगा पुण्याला नोकरी करत होता. मोठी नात मराठी बोलणाऱ्या आमच्या कुटुंबात वाढत होती. मराठी बोलणारी मुलं जिथे आहेत, अशा पाळणाघरात ती जात होती. त्यामुळे दोन वर्षांची झाली तेव्हा म्हणी, वाक्प्रचार वापरून ती उत्तम मराठी बोलायला लागली होती. माझी सासू, म्हणजे तिची पणजी, तेव्हा आमच्या घरात होती. त्यामुळे 'कर्म', 'दुर्दैव' असे आपल्या पिढीच्या फारसे वापरात नसलेले शब्द मोठी नात योग्य तिथे वापरायची.

दुसरी नात सहा महिन्यांची असताना मुलानं बंगलोरला नोकरीसाठी जायचं ठरवलं. दुसरी नात आता दोन वर्षांची झाली आहे, पण ती मुळीच बोलू शकत नाही. याचं कारण एकच. भाषिक गोंधळ!

बंगलोरची राज्यभाषा कन्नड, पण त्या शहरात तमिळ आणि तेलुगू ह्या भाषाही बोलल्या जातात. यातली एकही भाषा माझ्या मोठ्या नातीला येत नव्हती.

संपर्कासाठी तिला एखादी तरी भाषा यावी म्हणून मुलानं आणि सुनेनं मोठीशी इंग्रजीत बोलायला सुरुवात केली. धाकटीच्या ती कानांवर पडायला लागली. मुलाचे मराठी मित्र घरी आले, सुनेचे आईवडील किंवा आम्ही बंगलोरला गेलो की मराठीतून बोलणं व्हायचं. नोकरचाकर आणि अपार्टमेंटमधील माणसं कन्नड, तमिळ, तेलुगू ह्या भाषांत संवाद साधायची. धाकटीच्या कानांवर ह्या सर्व भाषा पडायच्या.

भाषाग्रहणाच्या काळात कानांवर एकाच वेळी पाच भाषा पडायला लागल्यामुळे धाकट्या नातीला कोणतीच भाषा नीटपणे ग्रहण करता आलेली नाही.

ती वाक्यच्या वाक्यं बोलते. बोलताना तिची सुरावली वर-खाली होते. बोलत असताना ती ठसक्यात हातवारेही करते, पण ती जे बोलते त्यातील एकही शब्द या पाच भाषांतला नसतो. तिने स्वतः तयार केलेल्या अगम्य भाषेत ती बोलत असते. तिने बोललेले आम्हांला समजावे अशी अपेक्षाही ती ठेवत असते.

धाकटी नात भारतातली एखादी भाषा केव्हा बोलायला लागेल, याची आम्ही वाटत बघत आहोत!

पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्ये शिकवणाऱ्या एक प्राध्यापिका मला माहीत आहेत. त्या स्वतः गुजराती होत्या. त्यांनी एका केरळी माणसाशी लग्न केलं. डेक्कन कॉलेजच्या आवारात त्या राहात असल्यामुळे त्यांच्या मुलांच्या कानांवर हिंदी, इंग्रजी आणि मराठी या भाषाही पडायच्या. या बाई अभिमानानं सांगायच्या, 'माझी मुलं बहुभाषी होतील.'

एकाच वेळी अनेक भाषा कानांवर पडण्याची परिस्थिती सध्या भारतात अनेक ठिकाणी निर्माण झालेली असणार. अनेक भाषांच्या होणाऱ्या संस्कारांमुळे प्रांतिक भाषा आपले सौंदर्य, लालित्य, सहजता तर घालवून बसणार नाही ना, अशी भीतीही वाटू लागली आहे.

काही राष्ट्रांनी मात्र आपली 'एक भाषिकता' कटाक्षाने जपलेली दिसते. पुणे विद्यापीठातील एक प्राध्यापक व्याख्याने देण्यासाठी नुकतेच जपानला गेले होते. त्यांच्याकडून जपानच्या भाषाव्यवहाराबद्दल कळलं. या प्राध्यापकांच्या व्याख्यानांच्या वेळी त्यांचे विचार जपानीत अनुवादित करणारा एक दुभाषा सतत त्यांच्याबरोबर असे. जपानमधल्या बहुसंख्य लोकांना जपानी सोडून अन्य कोणतीही भाषा येत नाही, हे त्यांच्या निदर्शनास आलं. 'फ्रान्स'मध्ये फ्रेंच येत नसेल, तर व्यवहार करता येत नाहीत. रशियामध्येही साम्यवादी सत्ता

कोसळण्यापूर्वी रशियन आणि प्रादेशिक बोलींमध्येच व्यवहार व्हायचे. इतर भाषा त्यांना यायच्या नाहीत. रशियाने खुली अर्थव्यवस्था स्वीकारल्यानंतर तिथे इंग्रजी भाषेचा प्रवेश झाला.

'नाना फडणवीस आणि एक बहुभाषी प्रवासी' यांची गोष्ट सर्वांनाच माहीत आहे. हा बहुभाषी प्रवासी गाढ झोपलेला असताना नानांनी त्याच्या तोंडावर पाणी मारलं. तो ज्या भाषेत ओरडत उठला, ती त्याची निजभाषा हे नानांनी ओळखलं.

माणसानं कितीही भाषांवर प्रभुत्व मिळवलं तरी एक कुठली तरी त्याची निजभाषा असते. या भाषेत तो विचार करता असतो, चिंतन करत असतो, स्वतः स्वतःशी संवाद साधत असतो.

डॉ. कल्याण काळे हे माझे स्नेही. त्यांच्याशी 'बहुभाषिकत्व' या विषयावर बोलत असताना त्यांनी सहज एक प्रसंग सांगितला. एक सिंधी लेखक त्यांच्या खूप परिचयाचा होता. तो सिंधी आणि इंग्रजी या दोन्ही भाषांत उत्तम साहित्यनिर्मिती करत असे. पुढे त्यानं इंग्रजीमध्ये लिहिणं सोडून दिलं. तो फक्त सिंधीतच लिहीत राहिला. याविषयी विचारलं असता तो म्हणाला, "इंग्रजीमध्ये लिहिलं की मी आतून भुकेला राहतो. सिंधीमध्ये लिहिल्यानंतर जे समाधान मला मिळतं, ते इंग्रजीमध्ये लिहून कधीच मिळत नाही."

प्रत्येकाच्या आयुष्यात त्याला आपली, जवळची वाटणारी एक निजभाषा असते. दुसरी भाषा तिची जागा घेऊ शकत नाही.

डेक्कन कॉलेजमधल्या त्या प्राध्यापिकाबाईंच्या मुलांना भले चार-पाच भाषा येत असतील, पण त्यांतली कुठली तरी त्यांनी निजभाषा म्हणून निश्चित स्वीकारलेली असणार. ती त्यांची 'मातृभाषा (म्हणजे आईची भाषा) असेलच याची खात्री देता येणार नाही.

■

**अंजली सोमण**

**मुखपृष्ठाच्या चित्रावरून आठवणाऱ्या ओळी**

"झाडहि बेटे रसिक असे की
पानांनी कुरवाळीत बसले तिचिया गाली"

- ना. धों. महानोर








# ज्ञानभाषा मराठी : गुणवत्ता आणि विस्तार

**अशोक रा. केळकर**

भाषेचा वापर तीन प्रकारे होतो आणि ज्ञानभाषेलाही ते लागू आहे. ज्ञानभाषा वापरणं म्हणजे कुणाला तरी पूर्वी नसलेलं ज्ञान सांगणं किंवा कुणीतरी प्रश्न विचारून ज्ञान मागणं किंवा कुणीतरी मिळत असलेलं ज्ञान समजून घेणं किंवा कुणीतरी मिळालेल्या ज्ञानाला ते पुन्हा सांगून उजाळा देणं. म्हणजे ज्ञानभाषेचा वापर व्हायचा तर जाणता ज्ञानवंत आणि नेणता जिज्ञासू या दोघांनी एकत्र येऊन सहकार्य करायला पाहिजे. जाणता ज्ञान देताना कुचराई करू लागला किंवा नेणता ज्ञान घेताना उपडा घडा घेऊन गेला तर कसं व्हायचं? जे काही बोलायचं-लिहायचं, किंवा ऐकायचं-वाचायचं, किंवा ऐकून-वाचून पुन्हा एकदा बोलायचं-लिहायचं ते जर समजून-उमजून केलेलं नसलं तर कसं व्हायचं?

दुर्दैवानं शब्दांचा अर्थ न समजता-उमजता या गोष्टी करता येतात आणि आपल्या शिक्षणाच्या आणि परीक्षा घेण्याच्या पद्धतीत ज्ञानभाषेचा वापर अशा विकृत रीतीनेच पुष्कळदा केला जातो, मग ही ज्ञानभाषा मराठी असू दे की इंग्रजी असू दे. हा तर ज्ञानभाषेचा नकली वापर झाला! ज्ञानभाषा मराठीच्या वापराची गुणवत्ता वाढवायची असेल, आपले शिक्षण खरोखरीचं शिक्षण व्हायचं असेल आणि आपलं परीक्षा घेणं लुटुपुटीचं व्हायचं नसेल तर काही पथ्यं पाळावी लागतील आणि त्यांतलं पहिलं पथ्य म्हणजे ज्ञानभाषेचा हा नकली वापर थांबवणं. विद्याभ्यास म्हणजे शब्दांची घोकंपट्टी आणि पोपटपंची नव्हे तर विद्येचा सराव. अभ्यास म्हणजे सराव, पण तो शब्दांचा सराव नव्हे, तर अर्थाचा सराव. एक सहज आठवणारं उदाहरण म्हणजे भूमितीमधल्या प्रमेयांचा अभ्यास म्हणजे ती जशीच्या तशी उतरवून काढायला शिकणं नव्हे, तर प्रमेयांवर आधारलेली रायडरं सोडवायला शिकणं. रायडर परीक्षेत सोडून देणाऱ्या परीक्षार्थी मंडळींना आणि ती ऑप्शनमध्ये टाकण्याची सोय पाहणाऱ्या नकली परीक्षकांना हे सांगून काय उपयोग? माझ्या विद्यार्थी-दशेत टिपणं डिक्टेट करणाऱ्या काही नकली शिक्षकांशी आणि माझ्या शिक्षक-दशेत नकली प्रश्न विचारणाऱ्या सह-परीक्षकांशी मला भांडावं

---

लागत असे! ज्ञानभाषा मराठीचा वापर वाढायचा असेल तर भाषेचा हा भ्रष्ट वापर थांबायला पाहिजे.

ज्ञान देणं आणि ज्ञान घेणं यात विचार करून प्रश्न विचारणं आणि विचारलेल्या प्रश्नांचं विचार करून उत्तर देणं यांचा मोठाच भाग असतो. मात्र विचारणं आणि विचार करणं या दोन क्रिया एकमेकींशी संबंधित आहेत हेच आपल्या ध्यानात पुष्कळदा येत नाही. मागच्या पिढीतले एक नामवंत संबंधित शिक्षक प्राध्यापक न. र. फाटक एकदा व्याख्यान दिल्यावर श्रोत्यांना प्रश्न विचारायचं आवाहन करत होते; त्यांनी याची आठवण करून दिली की प्रश्न म्हणजे 'आतून आलेले प्रश्न' त्यांना अपेक्षित होते, केवळ मनाचा चाळा म्हणून आलेले प्रश्नरूपी बुडबुडे त्यांना नको होते. शिक्षणव्यवहार जर दोन्ही बाजूंनी प्रश्न आले तरच पूर्ण होतो आणि संपन्नही होतो. आपण शिकवलेलं विद्यार्थ्यांना कितपत समजलं आहे हे अजमावण्यासाठी शिक्षक कधी शिकवता-शिकवताच, कधी शिकवण्याच्या एका टप्प्यानंतर, तर कधी शिकवणं पूर्ण झाल्यानंतर वर्षअखेर प्रश्न विचारतात एवढं आपल्याला माहीत आहे. विद्यार्थ्यांची परीक्षा घेणं हा त्यांना शिकवण्याचा अविभाज्य भाग आहे. आरडाओरडा करायचा तर परीक्षेला अतिरेकी महत्त्व देण्याच्या विरोधात करायचा; किंवा त्याहून म्हणजे घोकंपट्टीला किंवा विद्येच्या खऱ्या सरावाला ऑप्शनमध्ये टाकायला उत्तेजन देणाऱ्या नकली परीक्षा घेण्याच्या विरोधात करायचा. आपल्याला अजून न कळलेली किंवा कळूनसुध्दा न वळलेली गोष्ट म्हणजे विद्यार्थ्यांनी शिक्षकांना वर्गात किंवा वर्गाबाहेर प्रश्न विचारायचे असतात ही गोष्ट. माझे काही शिक्षक तर अधूनमधून चक्क शंकासमाधानाचा तास ठेवत असत; शिक्षक झाल्यावर मीही तो प्रयोग करून पाहिला आहे. दोन्ही खेपेला खूप मजा आली आणि मला खूप काही शिकायला मिळालं. शिक्षक आणि विद्यार्थी यांचा मातृभाषेच्या कुशीत व्यवहार होत असला तर शंकासमाधानाचा हा भाग विशेषच फळतो-फुलतो. शंका तीन प्रकारच्या असतात. शिकवलेलं काहीच समजलं नाही तर 'रामाची सीता कोण?' असला प्रश्न येतो, शिकवलेलं अर्धंकच्चं समजलं तर 'रामानं सीतेला माझ्याबरोबर वनात येऊ नको असं का बरं म्हटलं?' अशा प्रकारचा प्रश्न येतो, तर कधी शिकवलेलं सगळं समजलं पण समाधान झालं नाही तर 'धोबी जसा रामाचा प्रजाजन होता तशी सीताही त्याची प्रजाजन नव्हती का?' असा प्रश्न येऊन थडकतो. प्रश्न जसजसे मार्मिक होत जातात तशी जणू शिक्षकाचीच परीक्षा घेतली जाते. या परीक्षेला

शिक्षकानं कधीच घाबरू नये. या प्रश्नाचं उत्तर मी विचार करून नंतर देईन किंवा या प्रश्नाचं उत्तर मुलांनी थोडा आणखी विचार केला तर त्यांचं त्यांनाच सापडेल असं सांगायला शिक्षकानं टाळाटाळ करू नये. या प्रश्नाचं उत्तर मला माहीत नाही असं सांगून मला व्याकरण शिकवणाऱ्या शिक्षकांनी माझ्या हातात एक भाषाशास्त्राचं पुस्तकच ठेवलं होतं! शिक्षक-विद्यार्थ्यांचं नातं किती पवित्र आहे हे त्या प्रसंगी माझ्या मनावर कायमचं ठसलं, व्याकरणाच्या या शिक्षकांबद्दलचा मला वाटणारा आदर दुणावला, कमी झाला नाही.

तिसरं आणि सगळ्यात महत्त्वाचं पथ्य म्हणजे ज्ञानभाषेच्या वापरात समाजात अगोदरपासून उपलब्ध असलेलं ज्ञान तर असतंच पण अगोदर उपलब्ध नसलेलं नवीन ज्ञानही यावं लागतं. या ठिकाणी प्रश्न विचारून ज्ञान मागणारी आणि त्यांना उत्तर देऊन ज्ञान पुरवणारी व्यक्ती पुष्कळदा एकच असते. अशी व्यक्ती जशी आपल्या डोक्यात 'वरून फळ का पडलं' हे शोधून काढणारा एखादा थोर संशोधक असेल तसा एखादा छोटा चौकस विद्यार्थीही असेल. परीक्षा देणंघेणं आणि विचार करून प्रश्न विचारीत राहणं यांचा जसा ज्ञानप्रक्रियेशी अविभाज्य संबंध आहे तसाच बुद्धीचा उपयोग करून उत्तर शोधून काढणं आणि लागलेला शोध समाजाला उपलब्ध करून देणं यांचादेखील ज्ञानप्रक्रियेशी घनिष्ठ संबंध आहे. विवरलेचि विवरावे हे तर खरंच. पूर्वी कुणी न विवरलेलं विवरून सांगणं हे तर त्याहून खरं. आपल्या परंपराप्रिय समाजात ही जाणीव तशी कमीच. मग मुलांना स्वतःच्या बळावर विचार करून किंवा ग्रंथालयाचा धांडोळा घेऊन काही शोधून काढायला उत्तेजन देणं दूरच! ही शोधक बुद्धी जोपासणं जसं छोट्यांना उपकारक होतं तसं थोरांनाही उपकारक होतं. उत्तम शिक्षक ज्याप्रमाणे सदाचा विद्यार्थी असतो तसा छोट्या प्रमाणात का होईना पण नम्र संशोधकही असायला पाहिजे. विद्येनं विनम्रता येते म्हणतात ती अशा संशोधनाचा अनुभव असल्यामुळे. आयत्या मिळालेल्या विद्येनं अंगी नम्रता येण्याऐवजी ताठाच येण्याचा संभव जास्त! हे शोधक बुद्धीचं क्षेत्र संशोधन संस्था, विद्यापीठं आणि शाळा यांच्यापेक्षा कितीतरी विस्तृत असतं याची जाणीव आपल्या समाजात आता थोडीथोडी होऊ लागली आहे. कारखाने, शेतकीखातं, रुग्णालयं अशा अनेक ठिकाणी संशोधन आणि विकास विभाग निघू लागले आहेत पण ही जाणीव अजून तशी उपरीच आहे. आर. अँड डी. सेक्शन म्हणजे संशोधन आणि विकास विभाग हे तरी कितीजणांना ठाऊक असतं? खरं तर आपलं काम इमानेइतबारे करताना एखाद्या कामगाराला, शेतकऱ्याला किंवा

कर्मचाऱ्यालासुध्दा उपलब्ध ज्ञानाच्या संचितापलीकडे काही छोटेमोठे शोध लागू शकतात. इमानेइतबारे म्हणजे खाली मान घालून नव्हे, तर इमाने म्हणजे निष्ठापूर्वक आणि इतबारे म्हणजे भरवशाने याची इथे आठवण करून देतो. एका सामान्य ग्रीक नावाड्याला इसवी सनाच्या पहिल्या-दुसऱ्या शतकात शोध लागला की अरबी समुद्रावर ठरावीक महिन्यात ठरावीक दिशेनंच वारे वाहतात आणि हा शोध नोंदला गेला. नंतर तो अरबी व्यापाऱ्यांना मिळाला आणि त्याला त्यांनी मोसमी वारे म्हटलं, पुढे भारताच्या फार्सी, तुर्की, इंग्रजी बोलणाऱ्या विदेशी राज्यकर्त्यांनी या वाऱ्यांचा संबंध पावसाशी आणि खरीफ आणि रबी पिकांशी जोडला. भारतीयांनी पूर्वी कधी संशोधकबुद्धीनं असा शोध लावला होता का आणि शिक्षक-बुद्धीनं तो संस्कृत, प्राकृत किंवा देशी भाषेत नोंदवला होता का, हे मला माहीत नाही. आजमितीस देशी भाषांतून हे तीन अरबी शब्दच वापरले जातात एवढे मात्र खरे. "मौसमी", "खरीफ" आणि "रबी".

'इतिहाससंग्रह', 'विविधज्ञानविस्तार', आणि 'बाळबोध' अशा वेगवेगळ्या पातळींवर ज्ञानप्रसार करणाऱ्या पूर्वीच्या नियतकालिकांचा वारसा सांगणारी नियतकालिके आज मराठीत निघत आहेत. शालेय पाठ्यपुस्तकं, धार्मिक वाङ्मय आणि कथाकादंबऱ्या यांच्या पलीकडे सामान्यतः न फिरकणारा मराठी प्रकाशक दाभोळकर किंवा यंदे यांची खंडित झालेली परंपरा पुनरुज्जीवित करतो आहे अशी सुखद शंका येते आहे. विविध महाविद्यालयीन पाठ्यपुस्तकं मराठीत निघत आहेत. मराठी विज्ञान परिषद, मराठी तत्त्वज्ञान परिषद, विचारवेध संमेलन यांसारखे उपक्रम कमीअधिक स्थिरावत आहेत. मराठीभाषक संशोधक, शिक्षक आणि व्यावसायिक आपापल्या क्षेत्रातील ज्ञान वृत्तपत्रीय पुरवण्या, नभोवाणी, दूरचित्रवाणी, विस्तार-विभाग, विविध व्यासपीठं इत्यादींच्या मार्फत सामान्य जिज्ञासूंपर्यंत पोचवण्याचा प्रयत्न करीत आहेत. ही सर्व स्थिती उत्साहवर्धक आहे. या उपक्रमांचा फायदा घ्यायला कोणत्या गटातले आणि कोणत्या प्रदेशातले श्रोते आणि वाचक किती प्रमाणात पुढे येत आहेत याचाही कुणीतरी शोध घ्यायला पाहिजे. संख्यापूर्तीच्या दृष्टीने ज्ञानभाषा मराठीच्या वापराची स्थिती सुधारत आहे. आता, गुणवत्तेच्या दृष्टीने काय स्थिती आहे आणि काय करायला पाहिजे? अशा प्रकारच्या लेखनाला उत्तेजन मिळावं म्हणून गुणवत्ता-पारितोषिके दिली जात आहेत हे ठीकच आहे. गरज भासते आहे ती अशाप्रकारच्या लेखनामधलं ज्ञान आणि त्या लेखनातली वाचकाभिमुख मांडणी यांच्या गुणवत्तेचे काटेकोर आणि प्रसंगी परखड



अनुक्रमणिका

परीक्षण होण्याची. शाबासकीची थाप जशी पाठीवर पडायला पाहिजे तसंच निरनिराळ्या ज्ञानक्षेत्रांतल्या तज्ज्ञांनी अशा लेखनाची कसून परीक्षणं करायला पुढे यायला पाहिजे. ना. गो. कालेलकर किंवा मे. पुं. रेगे यांच्यासारख्यांनी केलेल्या परखड परीक्षणांची परंपरा चालवण्याचं अप्रिय काम करायला आणि अशी काटेकोर परीक्षणं लिहून घेऊन प्रकाशित करायला कोण पुढे येणार? ज्ञानभाषा मराठीच्या वापराला त्याशिवाय प्रतिष्ठा येणार नाही.

■

**मूळ प्रकाशन : इ.-क्षेम पाक्षिक १५ ऑगस्ट २००१**
(URL : www.e-xem.com. **शिवाय** info@e-xem.com **पहावे.**)

**शब्दायन**

# पुराणातली 'वांगी?'

'पुराणातली वांगी पुराणात', ही म्हण अनेक वेळा ऐकण्यात येते. तिचा अर्थ असा लावला जातो, की पुराणात जे काही पुराणिकाने सांगितलेले असेल ते गांभीर्याने घ्यायचे नाही. म्हणजे तात्त्विक चर्चा ही तत्त्वाच्याच पातळीवर राहते. व्यवहारात तत्त्व वापरले जात नाही. थोडक्यात बोले तैसा 'न' चाले -असे वर्तन.

ही म्हण कशी निघाली असेल याचा विचार करताना मला वाटायचे, की बहुधा चातुर्मासातल्या पुराणात पुराणिकाने सांगितले असावे की चातुर्मासात कांदा, लसूण, वांगी ही वर्ज्य करावीत, पण घरी मात्र चातुर्मासात वांग्याची भाजी खाताना तो म्हणत असेल की पुराणातली वांगी पुराणात, घरात तो विचार करायची गरज नाही.

नंतर समजले की म्हणीचा अर्थ तोच आहे पण तिथे 'वांगी' नाहीत, वानगी आहे. वानगी म्हणजे उदाहरण. पुराणातली उदाहरणे पुराणातच राहतात, व्यवहारात त्यांचा वापर केला जात नाही. वानगीची 'वांगी' करण्यात कोण्या सुगरणीचा हात असेल काय?

■

**सुप्रिया सहस्त्रबुद्धे**
**विक्रम हाइट्स, राहुलनगरसमोर, कोथरूड, पुणे - ४११ ०२९.**

# भाट व त्याची लिपी

डॉ. हरिश्चंद्र बोरकर

झाडी पट्टीमध्ये 'दंडी' नामक एक लोककलावंत जमात वास करते. एका हातात वीणा आणि दुसऱ्या हातात टाळ घेऊन ते आपली कला सादर करीत असतात. या लोकनाट्याला 'दंडीगाण' असे नाव आहे. अंगात सैलसा अंगरखा आणि डोक्यावर पगडी असा वेश करून विवाह, बारसे, तेरवी वगैरे प्रसंगी ते आपली कला सादर करतात आणि यजमानांकडून व पाहुण्यांकडून बोजारा म्हणजे बिदागी प्राप्त करून घेत असतात. रात्रभर त्यांचे हे दंडीगाण चालत असते. बिदागी देणाऱ्या पाहुण्याचे नाव त्यांचा म्होरक्या हाताच्या खुणांनीच दुरूनच सांगतो आणि त्याचा सहकारी ते ओळखून आपल्या गाण्यात ते नाव गुंफतो.

हेच दंडी कलावंत वीणा व टाळ बाजूला ठेवून हातात संबळ घेतात आणि गोंधळ मांडायला सज्ज होतात. म्हणजेच गोंधळी म्हणूनही हेच दंडी आपली कला सादर करीत असतात. हे हरहुन्नरी कलावंत अनेकदा गावकऱ्यांच्या दंडारीतही सहभागी होत असतात.

शिरेगाव येथे बळीराम तुळशीराम वाघाये नामक वयोवृद्ध दंडी आपली लोककला परंपरेने जपून ठेवतो आहे. या गावी दंडी कलावंतांची सात कुटुंबे असली तरी त्यांनी दंडीगाण सादर करण्याचे कार्य केव्हाचेच बंद केले आहे. स्वतः बळीरामजींचे तीनही सुपुत्र या कलेपासून दूर आहेत. तिघांपैकी एक गाडीचालक असून अन्य दोघे शेतीमध्ये राबतात. म्हणजेच दंडीगाण सादर करणारे बळीराम वाघाये हे या परिसरातील एकमेव व अंतिम कलावंत उरले आहेत, असे म्हणता येईल. त्यांना रेंगेपार (कोहळी) या माझ्या जन्मगावी आणून त्यांच्याकडून आमच्या गावच्या पाच तरुणांना या अस्तंगत होऊ घातलेल्या लोककलेचे प्रशिक्षण देण्याचा खटाटोप अस्मादिकांनी सुरू केला आहे.

वयोवृद्ध बळीरामजींच्या सान्निध्यात आल्यानंतर त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे विविध पैलू उलगडायला लागले. या कलावंताच्या कलंदर व्यक्तिमत्त्वाचाही हळूहळू परिचय व्हायला लागला. आपल्याकडील सारी कला नव्या पिढीला सढळ हाताने

देण्यासाठी बळीरामजी उत्सुक आहेत, पण कोणीच त्याकरिता तयार नाही, हीच त्यांची व्यथा आहे.

त्यांच्याशी चर्चा करताना आणखी वेगळ्या माहितीची भर पडली. दंडीगाण व गोंधळ या दोन्ही लोककलांमध्ये निष्णात असलेला हा कलावंतसमुदाय वास्तविक 'भाट' या वर्गामध्ये मोडणारा आहे, हे जेव्हा मला कळले तेव्हा मी अवाक झालो. वेगवेगळ्या जातींची वंशावळ लिहून ठेवण्याचे काम परंपरेने त्यांच्याकडे असायचे. वर्षामधून एकदा ही मंडळी आपल्या यजमानाकडे जायची. त्यांची सारी वंशावळ त्यांना ऐकविणे आणि नवीन नावांची त्या वंशावळीमध्ये नोंद घेणे, हे त्यांचे काम असे. यजमानाकडून शिधा आणि बिदागी घेऊन ते तृप्त मनाने स्वगावी परतायचे. आता यजमानांना आपली कदर राहिली नाही, असा दारुण अनुभव बळीरामजी कथन करतात. त्यामुळे हे काम हळूहळू बंद पडले.

दंडी कलावंतांच्या प्रत्येक कुळाकडे वेगवेगळ्या जातीची वंशावळ सांभाळण्याचे काम असे. बळीरामजी वाघाये यांच्याकडे गवळी, तेली, सोनार व फुलमाळी यांच्या वंशावळीचे काम होते. सत्तर वर्षांच्या या दंडी उर्फ भाट कलावंताने आपल्याकडील वंशावळीच्या वह्या माझ्यासमक्ष ठेवल्या. पुरातन माहितीचा तो अमूल्य खजिना मी अधाशासारखा न्याहाळू लागलो, पण मला त्या वाचताच येईनात. डोळे असून मी आंधळा होतो. साक्षर असूनही मी ठार निरक्षर झालो होतो. त्या वह्या मोडी लिपीत नाहीत, हे मला माझ्या मोडी लिपीसंदर्भातील तुटपुंज्या ज्ञानावरून कळले. महानुभाव वाङ्मय वेगवेगळ्या लिपींमध्ये लिहिले गेले. त्याची आठवण मला या प्रसंगाने होणे क्रमप्राप्त होते. महानुभावाच्या सुंदरी किंवा सकळी लिपीसारखीच ही वेगळी लिपी असावी, असा मी निष्कर्ष काढला.

या लिपीला 'नागरी' हे नामाभिधान असल्याचे मला बळीरामजी वाघाये यांच्याकडून कळले. या लिपीची गुंतागुंत कशी उलगडायची, हा माझ्यासमोर यक्ष प्रश्न होता. पुन्हापुन्हा 'वाचन' करूनही माझ्या डोक्यात किंचितही प्रकाश पडत नव्हता. महानुभाव वाङ्मयाचे अभ्यासक डॉ. वि. भि. कोलते यांना महानुभाव साहित्याची संहिता जाणण्यासाठी किती परिश्रम पडले असतील, त्याचा प्रत्यय त्याक्षणी मला आला. मनोमन डॉ. वि. भि. कोलते यांचा धावा करीत मी त्या पोथ्यांचे गूढ उलगडायच्या कामात स्वतःला गुंतून घेतले.

या वंशावळी धुंडाळताना काही पोथ्या देवनागरी लिपीतही लिहिलेल्या आढळल्या. विशिष्ट नावांची पुनरावृत्ती वारंवार होत होती. अशीच पुनरावृत्ती

मागच्या एका पोथीत झाली असल्याचे अचानक आठवले. या दोन पोथ्या समान असाव्यात, केवळ लिपीत काय तो फरक आहे, या निष्कर्षाप्रत मला येता आले. दोन्ही पोथ्यांची निरखून तुलना करता हा निष्कर्ष सत्य ठरला आणि हळूहळू 'नागरी' लिपी उलगडायला लागली. आतापर्यंत मुक्याचे व्रत घेतलेली ती मूळाक्षरे माझ्याशी बोलायला लागली आणि मूळ देवनागरीशी नागरीचा तर्जुमा पुढीलप्रमाणे साकार झाला.

## स्वर

| | | | |
|---|---|---|---|
| अ | आ | ए | ऐ |
| इ | उ | ओ | औ |

## व्यंजने

| | | | |
|---|---|---|---|
| क | ख | ग | घ |
| च | छ | ज | झ |
| ट | ठ | ड | ढ |
| त | थ | द | ध |
| न | प | फ | ब |
| भ | म | य | र |
| ल | व | स | ह |
| ळ | क्ष | ज्ञ | |

आपली नेहमीची देवनागरी लिपी संम्मिती किंवा वळणदार असून वळणे घेऊन एक एक मूळाक्षर तयार करते. तर भाटाच्या संहितांमधील ही मूळाक्षरे सरळ रेषांच्या साहाय्याने आकारास येतात. शिवाय या रेषा परस्परांना स्पर्श करीत नाहीत. रेषांना स्पर्श झाल्यामुळे किंवा वर्तुळाकार वळण घेतल्यामुळे तो भाग फाटण्याचा संभव असतो. तो त्रास या रेषीय पद्धतीमुळे दूर करण्यात आला आहे, असे म्हणता येईल. भूर्जपत्रावर लेखन करण्याच्या काळात ही 'नागरी' लिपी खरोखर फार सोईस्कर होत असावी. कागदाच्या जन्मापूर्वी अशाच लिपीची आवश्यकता भासली असेल.

ही रेषीय लिपी न्याहाळल्यानंतर आपल्याला कॅल्क्युलेटरची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. कारण कॅल्क्युलेटरवरील अक्षरे अशाच रेषीय पद्धतीचा वापर करून काढलेली असतात. म्हणजे आजच्या कॅल्क्युलेटरच्या युगामध्ये योग्य अशी लिपी आपल्या या दंडी अर्थात भाट जनांनी फार पूर्वीच स्वीकारली होती असे दिसून येते. आताही या लिपीचा उपयोग करून आपल्याला कॅल्क्युलेटरला सामोरे जाता येऊ शकेल. किंबहुना कॉम्प्युटरलाही ही भाटांची 'नागरी' लिपी सोईस्कर होऊ शकेल, असे म्हणता येईल.

बळीरामजी वाघाये यांना मी या लिपीमध्ये त्यांचे नाव लिहून दाखविले. स्वतःचेही नाव या लिपीत लिहिले. आपल्या पूर्वजांचा अनामिक ठेवा एका माणसाने 'शोधून' काढला. त्याबद्दलची अपार कृतज्ञता बळीरामजींच्या सुरकुत्या पडलेल्या चेहऱ्यावर स्पष्टपणे दिसत होती. त्यांच्या नजरेतही तेच भाव ओतप्रोत भरलेले होते. माझे दोन्ही हात आत्मीयतेने आपल्या थरथरत्या हातात घेऊन तो अखेरचा दंडी-भाट कलावंत उद्गारला, "साहेब, तुम्हांला निळावंतीची सिद्धी प्राप्त आहे."

बळीरामजींच्या या सहजोद्गाराने माझ्या संशोधनाचे प्रमाणपत्र लिहिले आहे, असे मला तेव्हा वाटले.

**मु. रेंगेपार (कोहळी), पो. पिंपळगांव (सडक)**
**ता. साकोली, जि. भंडारा ४४४ ८०४ (महाराष्ट्र)**

**सूचना फलक :** वर्ष १९ : अंक ३ पावसाळा २००१ या अंकातील शिरीन कुलकर्णी यांच्या लेखाचे शीर्षक असे हवे - "मऱ्हाटी संस्कृतीच्या ऱ्हासाचे पहिले पाऊल" झालेल्या चुकीबद्दल आम्ही दिलगीर आहोत.

# वृत्तपत्रीय भाषेची संकल्पना आणि डॉ. परुळेकर

स्वाती कर्वे

'वृत्तपत्रातील भाषा' ही भाषिक वापराची स्वतंत्र संकल्पना आहे. मराठी वृत्तपत्रसृष्टीत भाषिक वापराची स्वतंत्र संकल्पना घडवून ती रुजवण्याचे ऐतिहासिक कार्य दैनिक 'सकाळ'चे संस्थापक, संपादक कै. डॉ. ना. भि. परुळेकर यांनी 'सकाळ'च्या माध्यमातून केले.

'सकाळ' - पूर्व मराठी वृत्तपत्राची शंभर वर्षांची परंपरा होती; परंतु वृत्तपत्राच्या भाषेच्या दृष्टीने संकल्पना आकाराला आलेली नव्हती. वृत्तपत्राचे स्वरूप, विषय आणि आशय वृत्तप्रधान दैनिकाचे नव्हते. या मागे अनेक कारणे होती.

केवळ मराठीच नव्हे तर एकूणच भारतीय वृत्तपत्रांची निर्मिती वृत्तपत्राच्या तात्त्विक जाणिवेतून झालेली नव्हती. विचार प्रगटीकरण, ज्ञानदान आणि वैचारिक उद्‌बोधन वा तीन तत्कालीन काळाच्या गरजांतून वृत्तपत्राचा प्रारंभ झाला होता. समाजामध्ये पूर्णपणे वृत्तपत्रविषयक अनभिज्ञता होती. एकंदर समाजजीवन वृत्तपत्रविकासाच्या दृष्टीने प्रतिकूल होते. या सर्व कारणांचे परिणाम वृत्तपत्राच्या स्वरूपावर झाले.

एकंदरीत 'मतपत्र' हे त्याकाळी वृत्तपत्रांचे प्रातिनिधिक रूप होते. ज्ञानदान हे प्रधान उद्दिष्ट मानल्याने त्यातील लेखनशैली निबंध लेखनाच्या अंगाने विकसित होणारी होती.

वृत्तपत्राची मांडणी, पृष्ठांना वृत्ताच्या दृष्टीने असणारे महत्त्व, पानांची आखणी (ले-आउट), फोटो, चित्रे, नकाशे यांचा वापर - वृत्तलेखनाचे तंत्र; या दृष्टीने अज्ञानच होते. 'वृत्तपत्र' या दृष्टीने 'वृत्त' मर्यादित असे. 'वर्तमानसार' यावरच समाधान मानले जाई. 'मतपत्र' ते 'वृत्तपत्र' या दिशेने मराठी वृत्तपत्रांचा प्रवास टप्प्याटप्प्याने - मंदगतीने झाला.

समाजात राष्ट्रवादी जाणिवेने जन्म घेतल्यानंतर, विशेषतः 'केसरी'च्या प्रभावाच्या काळात वृत्तपत्रीय भाषेने तेजस्वी रूप घेतले. राष्ट्रवादी विचारांचा प्रसार, स्वातंत्र्याचा उद्‌घोष आणि त्या दृष्टीने जनजागृती ही उद्दिष्टे मानल्याने

वृत्तपत्रीय भाषा ग्रांथिक, पल्लेदार वाक्यांची - आवेशयुक्त बनली होती.

लोकमान्य टिळकांना वृत्तपत्राच्या तांत्रिक बाबींचे भान होते. मुद्रणाच्या दृष्टीने आवश्यक ती जागरूकता त्यांच्याजवळ होती; परंतु 'केसरी' हा त्यांच्या एकूण कार्यातील एक भाग होता. वृत्तपत्र विकासाच्या दृष्टीने त्यांनी 'केसरी'कडे बघितले नव्हते. लोकमान्य टिळक, नाटककार काकासाहेब खाडिलकर, 'काळ'चे संपादक शिवराम महादेव परांजपे, 'केसरी'चे उत्तर काळातील संपादक न. चिं. केळकर यांच्या लेखनातून वृत्तपत्रीय लेखनाचे काही संकेत निर्माण झाले; परंतु त्यांचे एकंदर स्वरूप वाङ्मयीन, साहित्यिक दर्जाचे होते. वृत्तपत्रीय नव्हते. सामाजिक, सांस्कृतिक दृष्टीने वृत्तपत्र समाजाच्या सर्व थरांपर्यंत पोहोचलेले नव्हते. परिणामी बुध्दिवादी, सुशिक्षित, जागृत समाजापर्यंतच वृत्तपत्राचा विस्तार झाला. त्या पलीकडचा समाज वृत्तपत्रापासून दूर होता.

त्या सुमारास वृत्तपत्राचे आशयक्षेत्र मर्यादित होते. वृत्तप्रधानतेची जाणीव नव्हती. एकंदर वृत्तप्रधान दैनिकाची कल्पना वृत्तपत्र चालकांना नव्हती आणि पर्यायाने समाजाला नव्हती.

वृत्तपत्रविषयक अभिरुची, जीवनातील वृत्तपत्राची अपरिहार्यता जाणवण्याइतकी समाजाची जाणीव प्रगल्भ नव्हती. 'सकाळ'पूर्वकाळात 'संदेशकार' अच्युत बळवंत कोल्हटकर आणि 'ज्ञानप्रकाश'चें संपादक काकासाहेब लिमये यांनी वृत्तलेखनाच्या दृष्टीने लक्षणीय बदल केले. वृत्ताचा मथळा, लीड, नंतर वृत्त या तंत्राने बातमी देण्याचे प्रयत्न झाले; परंतु त्यामध्ये नेमकेपणा नव्हता. वृत्तपत्राची पोहोचमर्यादा सामाजिक दृष्टीने विस्तृत करण्याची दृष्टी संपादक म्हणूनही मर्यादित होती. याचे कारण तो त्या संपादकांचा व्यक्तिगत दोष नव्हता. संपादक म्हणून त्यांचा विकास वृत्तपत्राच्या तांत्रिक अंगाने आणि वृत्तपत्राचे निखळ रूप असणाऱ्या समाजात झालेला नव्हता. ही परिस्थितिजन्य त्रुटी होती.

या सर्व पार्श्वभूमीच्या आणि पूर्वपरंपरेच्या दृष्टीने नानासाहेबांची दृष्टी पूर्णपणे नवीन, स्वतंत्र आणि पूर्वपरंपरा नाकारणारी होती. वृत्तपत्राविषयी मुळातच एक ओढ नानासाहेबांच्या व्यक्तिमत्त्वाच्या गाभ्यामध्ये होती. स्वतःचे वृत्तपत्र काढण्याची त्यांना महत्त्वाकांक्षा होती.

अमेरिकेत तत्त्वज्ञानासारख्या विषयात प्रथम एम्.ए. आणि नंतर पीएच्.डी. करीत असताना डॉ. परूळेकरांनी वृत्तपत्रे आणि नियतकालिके यांचे

वाचन केले. निरीक्षण केले. विषयाच्या मांडणीपासून वृत्तपत्राच्या रचनेपर्यंत तात्त्विक अंगाने वेध घेतला. वृत्तपत्रातून विपुल लेखन सातत्याने केले. त्यातून त्यांचे प्रशिक्षण झाले. वृत्तपत्राची भाषा कशी असली पाहिजे - याविषयी त्यांना जाणीव झाली.

वृत्तपत्रीय लेखन दैनंदिन भाषेत झाले पाहिजे, कारण वृत्तपत्र हे समूह संपर्काचे व्यापक माध्यम आहे. सामाजिक दृष्टीने विशिष्ट वर्गापुरते मर्यादित नाही, हे त्यांना प्रामुख्याने समजले होते. त्यांनी एके ठिकाणी नमूद केले आहे, "माझे इंग्रजी उत्तम होते, परंतु ते पुस्तकी होते. भाषाही तशीच होती. तिथली माणसे जे बोलतात, व्यवहारात ज्या पद्धतीने बोलतात, त्या पद्धतीची माझी भाषा नव्हती. वर्तमानपत्रात ग्रांथिक भाषेत लिहून चालत नाही. याची जाणीव, मला माझे लेखन पुन्हा पुन्हा दुरुस्त करावे लागत होते, त्यातून झाली."

वृत्तपत्राच्या स्वरूपाविषयीच्या नानासाहेबांच्या संकल्पना या पद्धतीने अमेरिकेतील पत्रकारितेवर पोसल्या गेल्या. भारतात परत आल्यानंतर त्यांच्या लक्षात आले, की सामाजिक दृष्टीने वृत्तपत्रांचे स्वरूप विशिष्ट वर्गापुरते मर्यादित होते. जीवनाच्या सर्वांगास स्पर्श करणारे सर्वसमावेशक स्वरूप वृत्तपत्राचे नव्हते. इथेच त्यांच्या संकल्पना, वेगळ्या व स्वतंत्र होत्या. 'वृत्तप्रधान दैनिकाची' सांस्कृतिक दृष्टीने गरज होती. काळाची गरज होती. वृत्तपत्रांची वाटचालही या दिशेनेच पावले टाकीत होती. या वातावरणात मळवाटेने जायचे नाकारून स्वतंत्र वाटेने जाऊन आपले स्वतःचे वृत्तपत्र सुरू करण्याचा निर्धार त्यांनी केला.

'केसरीची दोन पाने वेगळी करून देतो. तुम्ही आपल्या कल्पनेप्रमाणे ती चालवा' हा न. चिं. केळकर यांचा प्रस्ताव नानासाहेबांनी नाकारला कारण त्यांच्या मनातील संकल्पना 'केसरी'च्या प्रकृतीशी जुळणारी नव्हती. 'केसरी' दैनिक नव्हते. द्विसाप्ताहिक होते.

अमेरिकेतील संकल्पनांना घेऊन मराठी वृत्तपत्र सुरू करताना त्या कल्पना जशाच्या तशा न वापरता त्यांनी त्यांचे देशीकरण केले. इथले वातावरण आणि गरजा बघून कल्पनांचे उपयोजन केले. प्रत्यक्षात त्या कल्पना राबवताना दैनंदिन भाषेच्या आधारे एक संकर घडवला. कलम केले नाही.

"आपल्या वेगळ्या कल्पना मूर्त करून लोकशिक्षण करावे. जीवनाच्या सर्व क्षेत्रांतील जनतेला जागे करून वृत्तपत्र त्यांच्या घरात आणि जनतेला वृत्तपत्राच्या घरात असे जनतेच्या सुखदुःखाला वाहिलेले पत्र असावे." ही त्यांची कल्पना होती.

बातमी पुरवण्याच्या पलीकडची समृद्धी आणि संस्कार त्यांनी महत्त्वाचा मानला. 'एन्फॉर्म देम् ॲण्ड एनरिच देअर इन्फर्मेशन' हे सूत्र ठेवले. या धोरणानुसार 'सकाळ' प्रत्यक्षात अवतरला. दोन वैशिष्ट्यांना घेऊन. 'वृत्त' कल्पनेचा विस्तार, वृत्तमूल्य कल्पना अत्यंत लवचिक-स्थानिक घडामोडी ते आंतरराष्ट्रीय घटना. 'उद्या पाणीपुरवठा बंद!' 'मंडईत मटाराचे ढीग' सर्वसामान्यांच्या दैनंदिन जीवनाच्या दृष्टीने या दोन गोष्टींना वृत्तमूल्य आहे. लोकजीवनातील घडामोडींवर त्यांनी बातमीचा कॅमेरा फिरता ठेवला. 'प्लेगचा कहर', 'गणेशोत्सवात मेळ्याची धामधूम', 'सोन्या मारुती देवळातील सत्याग्रह', 'कचऱ्याची वाहतूक बंद मोटारीतून करावी', ही सूचना.' संक्रमणातून जाणाऱ्या जीवनाकडे लक्ष वेधून घेणे,' 'स्त्रियांनी गोल पातळ नेसावे का?' या सर्व विषयांना वृत्तपत्राच्या कक्षेत आणून वृत्तपत्राचा आशय - विस्तार केला.

कोणतेही वृत्त देताना वृत्ताची परिभाषा, वृत्तमांडणी यांविषयी तंत्र बसवले. सोप्या परंतु आकर्षक शब्दातील मथळा हवा. वृत्ताच्या गरजेप्रमाणे मथळा चार कॉलमी किंवा आठ कॉलमी त्या खाली बातमीचा सारांश - लीड हवेच. संपूर्ण वृत्ताची कल्पना त्यातून यावी. दिनांक, घटना स्थळ, बातमी कुठून प्राप्त, याचा निर्देश हवा. बातमीदार, खास बातमीदार यू.एन्.आय. पी.टी.आय. नोटवरून प्राप्त, अशी नोंद हवी. त्यानंतर सविस्तर वृत्त. घटनेची पार्श्वभूमी हवी. बातमी प्रत्यक्ष जागेवर जाऊन आणलेली असावी. अचूकता व सत्य, यांविषयी विशेष कटाक्ष होता.

दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी वेगवेगळी अनेक विशेषनामे येत. त्यांमध्ये एकसारखेपणा येण्यासाठी उच्चाराप्रमाणे अचूक नोंद करून ठेवायची, त्याप्रमाणेच ते विशेषनाम वापरायचे, ही पद्धत त्यांनी घातली होती. वृत्तमूल्यानुसार वृत्ताचे विविध प्रकार निर्माण केले. एखादी घटना एक दिवस बातमी देऊन पूर्ण होत नाही. विशिष्ट मथळा देऊन त्या घटनेचा मागोवा घेत राहणे. उदा., 'रवींद्र सरोवर प्रकरण', 'जोशी अभ्यंकर हत्याकांड', 'डॉ. लागू खून खटला'. राष्ट्रीय जागतिक घटना असेल तर वार्तापत्र, बातमीपत्र एका सदराप्रमाणे देत राहणे. उदा. दुसऱ्या महायुद्धाच्या काळात दैनंदिन बातम्यांबरोबर-'युद्धाचा गेला आठवडा' या साप्ताहिक सदरातून सर्वांगीण माहिती देण्याचा प्रयत्न, नकाशे, फोटो यांचा वापर. त्या खाली मजकूर हवा. 'चित्राने चित्त वेधते' ही अचूक दृष्टी त्यामागे होती.








या सर्व प्रकारची वृत्ते देताना अतिशय सोप्या भाषेविषयी त्यांचा आग्रह होता. त्यांनी आपला वाचकवर्ग सर्वसामान्य माणूस मानला होता. सर्वांना समजेल अशी सोपी, अर्थपूर्ण, तरीही लक्ष वेधून घेणारी भाषा हवी. अलंकारिक वर्णने नकोत, विशेषणांचा वापर नको. शक्यतो जोडाक्षरे नकोत - असे त्यांचे भाषेविषयीचे कटाक्ष होते. मोकळी जागा सोडायची नाही. जास्तीत जास्त मजकूर द्यायचा. त्यासाठी परिच्छेद संपणारी ओळ दोन शब्दांची नको. काय झाले हे तर समजले पाहिजे; परंतु त्यांसाठी, नेमकी भाषा शब्दरचना हवी. 'मंडईत मटाराचे ढीग' या बातमीने लक्ष वेधले जाणार. 'सोन्याच्या भावात घसरण', 'खाद्य तेलाचे भाव कडाडले', 'दिवाळीचा फराळ महागणार' यांसारखे मथळे देण्यावर भर होता.

आपला 'सकाळ' फक्त दत्तो वामन पोतदारांसाठी नाही. कोपऱ्यावरचा चांभार, स्टेशनवरचा हमालही 'सकाळ' वाचणार आहे. त्याला समजेल अशी भाषा हवी. त्यासाठी 'वृत्तसंस्थेकडून आलेल्या बातम्यांचे भाषांतर नको. त्याचे पुनर्लेखन करा.' अशी सक्त ताकीद होती. याविषयी ते अतिशय आग्रही होते. गरजेपेक्षा जास्त मोठे वृत्त नको आणि आवश्यकतेपेक्षा ते कमीही असता कामा नये.

वृत्ताबरोबर वाचकांशी संवाद करणारी जीवनास भिडणारी सदरे हवीत. वाचकांना लिहिते केले पाहिजे. त्यातून अनुभवांचे अभिसरण व्हावे. 'चुकते कोठे', 'उषावाहिनींचा सल्ला', 'आप्पा बाप्पा', 'शब्दकथा', 'घडामोडी', 'अजब अनुभव' - ही सर्व सदरे वाचकांकडून चालवली जात.

'सकाळ'पूर्वकाळात ज्ञानकोशकार केतकरांनी 'पुणे समाचार' दैनिक सुरू करताना, 'प्रत्येक पुणेकराला माझे दैनिक वाचायला लावीन' अशी प्रतिज्ञा केली होती, पण काही दिवसांनी 'पुणे समाचार' बंद पडले. प्रत्येक पुणेकराला हे पत्र आपले वाटले नाही. इथेच 'सकाळ'च्या यशाची बीजे आहेत.

वृत्ताचे सर्वसमावेशकपण, सामान्यांच्या जीवनाशी संवाद, अत्यंत सोपी अर्थपूर्ण भाषा - वाचकांचा सहभाग या वैशिष्ट्यांनी सकाळ अल्पकाळात लोकप्रिय झाला.

'तुम्ही कवी आहात, हे इथे विसरा', असे कुसुमाग्रजांना सांगणारे नानासाहेब होते, म्हणून त्यांनी डोळ्यांसमोर ठेवलेला वाचकवर्ग अल्पावधीत सकाळच्या कक्षेमध्ये आला. 'दोन रेल्वेगाड्यांच्या दरम्यान फलाटावर कोंडाळे करून हमाल 'सकाळ'चे वाचन करीत आहेत' - हा फोटो सकाळ प्रेस फोटोग्राफर सी.पु. थत्ते यांनी खुबीने अचूक टिपला होता. हे 'सकाळ'चे यश होते.

नानासाहेबांनी ‘सकाळ’मध्ये केलेले प्रयोग, कल्पना, ‘सकाळ’पुरत्या मर्यादित राहिल्या नाहीत. त्यांचे बाह्य परिणाम मराठी वृत्तपत्र सृष्टीवर झाले. वृत्तपत्राचे आशयक्षेत्र विस्तृत झाले. ते सर्वसमावेशक, जीवनाच्या सर्वांगाला स्पर्श करणारे झाले. ‘पहिले पान’ महत्त्वाचे ठरले. वृत्तमूल्य - न्यूज व्हॅल्यू मान्य झाली आणि वृत्ताची परिभाषा घोटवली गेली.

वृत्तपत्र या दृष्टीने त्याची स्वतंत्र भाषा हवी, तंत्र हवे, परिभाषा हवी. त्यातून यष्टिरक्षक, गोलंदाज, क्षेत्ररक्षण, फलंदाज, धावपट्टी, चौकार, षट्कार, धावबाद, झेलबाद यांसारखे असंख्य शब्द तयार झाले आणि वृत्तपत्राची संकल्पना आकाराला आली. याचे श्रेय ‘सकाळ’चे संस्थापक डॉ. नानासाहेब परूळेकर यांना द्यायला हवे.

■

१४१४, कसबा पेठ, शनिवारवाड्यासमोर, पुणे - ४११ ०११.
फोन - ४४५६९९५





अनुक्रमणिका








# जातीचे शब्द - शब्दांची जात

मृणालिनी गडकरी

रविवार दुपारची गोष्ट. आम्ही तिघी शेजारीणी गप्पा मारत होतो. सारस्वत शेजारीणीनं कौतुकानं विचारलं, "आज काय बेत होता? मासेऽऽ? वास येत होता नाऽऽ" मी चांद्रसेनीय कायस्थ प्रभू म्हणजे सी. के. पी., तेव्हा आमचं मत्स्यगोत्र जुळणारं. म्हणूनच हा कौतुकाचा प्रश्न. मी उत्तर दिलं, "हो. हलवा केलाय." तिसरी शेजारीण कोकणस्थ ब्राह्मण. माझं उत्तर ऐकून दोघीही क्षणभर गप्प झाल्या. मग न राहून ब्राह्मण शेजारीण म्हणाली, "अगोबाई! माशाचा हलवाही करतात, हे नव्हतं हो ठाऊक!" मी म्हटलं, "अहो, हलवा हे माशाचं नाव आहे. पदार्थाचं नाही." मग दोघींनीही एकदमच विचारलं, "हलवा म्हणजे?" मी म्हटलं, "असतो पापलेटसारखा पण काळा." "म्हणजे बकाळ पापलेट गऽऽ" सारस्वत शेजारीण हसत हसत म्हणाली. त्या दोघी गप्पात रमून गेल्या, पण माझ्या मनात मात्र भाषेबद्दलच्या विचारांनी गर्दी केली.

समाजात वावरताना आपण एक सर्वसाधारण भाषा बोलत असतो. सर्वांना समजेल अशी; पण प्रत्येक जातीची, प्रांताची अशी एक खास भाषा असते. ती प्रामुख्यानं स्वयंपाकघर, सणवार, व्रतवैकल्यं, विवाहासारखे समारंभ ह्या ठिकाणी बोलली जाते. आता वरचंच उदाहरण पाहा ना! इंग्रजी 'पॉम्फ्रेट'चं आम्ही केलं 'पापलेट' म्हणजेच सरंगा. जातीनुसार एकाच माशाला मिळाली दोन नावं. सारस्वतांचा हेल, कोकणस्थांचा ठसका माझ्या भाषेत नाही. माझी भाषा काहीशी साधीच, मिळमिळीत. विचार करायला लागले आणि खूप शब्द आठवायला लागले - आमच्यातले खास आणि खूपच गंमत वाटली.

डेचकी किंवा पसरट बसकं भांडं म्हणजे आमच्याकडे लंगडी. ही खूप उपयोगाची असते. तरीही लंगडीच. पकड किंवा सांडशी म्हणजे आमची 'गावी'. हे कोणाच्या गावीही नसेल. उलथणं म्हणजे कालथा. डावाला म्हणायचं 'पळी'.

रोजची पोळी - ती आमच्याकडे चपाती. पोळी म्हणजे पुरणपोळी. भाकरीला

अनेक वेळा दशमी म्हटलं जातं. गव्हाचं सत्त्व म्हणजे थुली. गोड्या वरणाला आम्ही वरण म्हणतो. फोडणीचं वरण म्हणजे आंबट वरण. (करण्याची पद्धत फोडणीच्या वरणापेक्षा थोडी वेगळी आहे.) मसूर, चवळी ह्यांसारख्या कडधान्यांची आमटी, पण माशाची आमटी म्हणजे कालवण. फ्लॉवर, बटाटा, टोमॅटो ह्यांचा रस्सा, पण मटणाच्या रश्शाला मात्र म्हणायचं पाणी. मग तो रस्सा चांगला दाट असला तरी पाणीच. मटणाच्या 'पीसेस्'ना म्हणायचं आतलं. वाल, मूग, पावटा, हरभरा, चवळी ह्यांना मोड आणून, सालं काढून केलेल्या आमटीला मात्र आम्ही बिरडं म्हणतो. मोड आलेल्या ह्या कडधान्यांची उसळ केल्यास तिला म्हणायचं 'सुक्कं बिरडं'. बाकी सर्व उसळींना आम्ही दाणे म्हणतो. उदाहरणार्थ, मसुरीचे दाणे, चवळीचे दाणे. डाळीच्या पिठात तिखट, मीठ, हळद, मसाला घालून त्याला वाफ आणून चौकोनी वड्या पाडतात आणि त्या मसालेदार रश्शात सोडतात. हा सीकेपींचा एक खास पदार्थ आहे. ही एक प्रकारची कोफ्ता करीच आहे. हिचा सांबाऱ्याशी काय संबंध? पण आम्ही ह्या पदार्थाला म्हणतो 'वडीचं सांबारं.' कांदा घालून वाटली डाळ म्हणजे वाटल्या डाळीचं पिठलं. पळीवाढं किंवा अंगाबेताच्या तोंडी लावण्याला आम्ही म्हणतो लिप्तं.

करंजी आमच्याकडे कानवला होतो. ओल्या नारळाची करंजी म्हणजे चवाचा कानवला. साट्याची करंजी म्हणजे खाजाचा कानवला. पुरणाचा मुरडीचा कानवला उकडून केला तर मात्र ती शेंग. हा पदार्थ नागपंचमीला करतात. श्रावणात शीतळासप्तमीला आमच्याकडे सांदणं करतात. सांदणं म्हणजे इडलीच; पण ती मोठ्या थाळ्यात करून चौकोनी वड्या पाडतात. गूळ घातलेल्या नारळाच्या दुधाबरोबर ती सुरमट (खमंग, चविष्ट) लागते. वालाच्या बिरड्याबरोबरही छान लागते. दह्यातल्या फ्रूट-सॅलेडला म्हणायचं बुरवणी. हरभरा डाळ, कणीक, गूळ आणि नारळाचं दूध विशिष्ट प्रमाणात एकत्र करून केकसारखा पदार्थ करतात ते निनावं. सीकेपींची हीही एक खासियत. धनत्रयोदशीला कणीक व गूळ एकत्र करून त्यांचे बोराएवढे गोळे करून तळतात व त्यांचा नैवेद्य दाखवतात. ह्यांना बोरंच म्हणतात. श्रावणात जिवतीची पूजा करून मुलांना 'आरत्यांचं वाण' देतात. आरत्या म्हणजे छोट्या छोट्या गोड्या पुऱ्या. कोणी आरत्या भज्यांसारख्याही करतात, पण भजी गोड.

मसालेभाताला सी.के.पीं.मध्ये खिचडी म्हणतात. मुगाच्या डाळीची खिचडी, साबुदाण्याची खिचडी आणि बटाटे, काजू ह्यांचीही खिचडीच. सोड्याची खिचडी










म्हणताच सी.के.पीं.च्या तोंडाला पाणी सुटतं.

चिकनला म्हणायचं कोंबडी. मासा हा सी.के.पीं.चा वीक पॉईंट. ओल्या मासळीइतकीच त्यांना सुकी मासळीही प्रिय. मासळीला म्हणायचं बाजार. बाजार आणणे म्हणजे मासे आणणे. बाजार उतरणे म्हणजे भाव कमी होणे नव्हे तर मासा खराब होणे. मांसाचा तुकडा म्हणजे तुकडी. अनेकवचन अर्थातच तुकड्या. सोड्याचा भाव सोन्याएवढा झाला, तरी सी. के. पी. सोड्याला सोडायला तयार नसतो. सोडा म्हणजे वाळवलेली कोलंबी (एक प्रकारचा मासा). बारीक कोलंबी वाळवल्यास 'सुकट' होते. अगदी बारीक कोलंबी म्हणजे 'जवळा.' सुरमई नावाच्या माशाच्या मीठ लावून वाळवलेल्या तुकड्यांना खारं म्हणतात. खारं खरंच खूप खारट लागतं. बोंबील वाळवले की त्या झाल्या काड्या. वाळवलेले बोंबील काड्यांसारखेच दिसतात. सी. के. पी. समुद्रातले खेकडे आवडीनं खातात. त्यांना म्हणतात चिंबोऱ्या. त्या चांगल्या 'भरलेल्या' म्हणजे मोठ्या असाव्या लागतात. मटण फोडणीस न टाकता सर्व मसाला लावून तेलावर टाकून शिजवणे म्हणजे भरून करणे. मटण, कोंबडी ह्यांच्याबरोबर कच्च्या भाजणीचे वडे करण्याची पद्धत आहे. 'संक्रांत वळायची आणि किंक्रांत तळायची' (संक्रातीला तिळाचे लाडू करायचे आणि करीला मटण वडे खायचे.) अशी आमच्यात मुळी म्हणच आहे.

ह्या सर्व तिखट पदार्थांना वेगवेगळे मसाले वाटून घालावे लागतात. त्याला वाटण म्हणतात. वाटणाचे बरेच प्रकार असतात. उदाहरणार्थ, हिरवं वाटण (मिरची, कोथिंबीर, कांदा), तळलेलं वाटण (कांदा, खोबरं आणि इतर गरम मसाला तेलावर चांगला परतून वाटणे), खोबऱ्याचं वाटण वगैरे.

'बाजार'ला जो दर्प येतो त्याला म्हणायचं 'हिवराळ.' वाल, पांवटे अशा कडधान्यांच्या उग्रपणाला 'हरवस' म्हणतात. मासळी ओशट म्हणजे वशट. तिचा हात ईकडेतिकडे लावायचा नसतो.

असं असतं सी.के.पी.चं खाद्य-जीवन. सी. के. पी. पुरुष खादाड नसतो; पण खवैया असतो. म्हणूनच स्त्रियांचा बराच वेळ स्वयंपाकघरात जातो. एका पदार्थाला दोन वाटणं लागतातच. जी एका वाटणात भागवते ती ऊठवळ. जी चवीक (चविष्ट) स्वयंपाक करते ती करणसाळ (सुगरण).

सणवार, समारंभ ह्यांच्या नावांतही गंमत आहे. केळवण म्हणजे गडंगनेर. ज्येष्ठ जावई पूजनाला म्हणायचं मधुपर्क. लग्नानंतर तिखटी मेजवानी झाल्याशिवाय सी.के.पीं.च्या लग्नाचं सूप वाजत नाही. लहानमोठे तिखट्या

मेजवानीकडे डोळे लावून बसलेले असतात. तिखटी मेजवानी म्हणजे मटणाचे किंवा कोंबडीचे जेवण. गणेश चतुर्थीच्या आधी आवरणं करतात. त्याला दाटा म्हणतात. त्या दिवशी निनावं आणि मटारचे कानवले करण्याची पद्धत आहे. शितळशिमग्याला म्हणतात गीम. वास्तुशांत म्हणजे घरभरणी. चैत्रात सवाष्णी देवीला पांढऱ्या फुलांचा किंवा कापसाचा हार घालतात तो चौसर.

रीतिरिवाजांत फरक पडल्यामुळे काही क्रियापदे आणि वाक्प्रचारही वेगळे असतात. गौर घरात आल्यावर संध्याकाळी तिला सर्व घरात फिरवतात. ह्याला म्हणायचं, 'गौर नाचवणे.' घटस्थापना म्हणजे 'देव बसणे.' लग्नात रुखवत मांडतात त्याला म्हणतात फराळ भरणे. औक्षण करणे म्हणजे दिवा उतरणे. भाजी परतायची पण कोलंबी सवताळायची. हे क्रियापद मला बंगालीत आढळलं तेव्हा खूप मजा वाटली. कदाचित हा समान मत्स्यप्रेमाचा परिणाम असावा. नवरात्रात सवाष्णींना तीर्थ म्हणून ब्रँडीचा घोट देतात, तेव्हा 'तीर्थ घेतलं का?' असे न विचारता 'नथ वर केली का?' असं विचारतात.

नात्यासाठीही विशिष्ट शब्द आढळतात. आदरार्थी 'राव' शब्द वापरतात. दीर, मेहुणे ह्यांना साहेब म्हणतात. उदाहरणार्थ, दादासाहेब, भाईसाहेब, बाळासाहेब, बापूसाहेब, रावसाहेब. बहुतेक वेळा मोठ्या मेहुण्याला भाईसाहेब, मोठ्या दिराला दादासाहेब आणि धाकट्या दिराला किंवा मेहुण्याला बाळासाहेब म्हटले जाते. नणंदेला ताई म्हणतात.. उदाहरणार्थ, शालनताई, पुष्पाताई.

आणखी एक गंमत आहे. किड्याला म्हणजे बाऊला घाबरणाऱ्या सी.के.पी. मुलांना मटणबाऊ, चिकनबाऊ, मासाबाऊ, अंडाबाऊ फार प्रिय असतो. असे अजून खूप काही सांगता येईल.

अशी ही विशिष्ट भाषा संस्कृतीचं वैशिष्ट्य जोपासत असते. जाती-धर्मातील विशिष्ट शब्दसंपदा लेवून भाषा सजत असते. म्हणून समाजाप्रमाणे भाषेनंही जातिभेद मानू नये. सर्वांचाच अंगीकार तिनं करावा. त्यामुळे येणाऱ्या विविधतेमुळे ती समृध्द होते, तिला सौष्ठव प्राप्त होते, तिचे सौंदर्य वाढते, नाही का?

■

**८-अ, 'कांचनबन', सेनापती बापट रस्ता, पुणे - ४११ ०१६.**

# 'दहा न् आठ, अठरा'

मो. गो. धडफळे

मी जर दुसऱ्या 'यत्ते'तला हुश्शार मुलगा असतो तर उजळणीच्या खास चालीवर 'दहा न् आठ, अऽऽठरा' व 'दहावर आठ, एकशेआठ' असं बरोब्बर उत्तर देऊन एखादी 'कॅडबरी' जरी नाही तरी 'लॉलीपॉप' तरी नक्कीच मिळवला असता. या साठीच्या घरात 'भाषा व जीवनच्या' सुबुद्ध वाचकांना मात्र मी ही बेरीज अन् हा आकडा सांगायला लागलो तर 'साठी न् बुद्धी नाठी' हे ऐकून घेणं एवढाच लाभ होईल.

एवढं खरं की भारतीय भाषाजीवनातील १०, ८ व १०८ या संख्यांचं महत्त्व सगळ्यांनाच माहीत असतं असं नाही. ते स्पष्ट करणं एवढाच काय तो या लेखाचा हेतू आहे.

**'हातचा आला एक'**

'हातचा आला एक' म्हणजे नेमकं काय? माझ्या कन्नडवरील प्रेमाधिक्यामुळं मला कित्येकदा 'हत्तू'चे आला एक, असाच हा प्रकार असावा असं वाटायचं. कारण कन्नडमध्ये 'हत्तु' म्हणजे 'दहा', पण ते तसे नाही. 'हातचे' याचा संबंध अगदी सरळ 'हाताचे' याच्याशीच आहे. हाताला दहा बोटे असतात. बोटांवर मोजणी केल्यावर दशमान पद्धतीत हातचा एक येतो. दोन्ही हातांची दहा बोटे असल्यानं दहा ही दशमान पद्धती वैदिक आर्यात रूढ झाली; म्हणूनच ऋग्वेदाची दहा मंडले झाली. एका 'पद्धती'त दहा श्लोक व अशा दहा 'पद्धतींचं एक अशी अनेक शतकं' तयार झाली. 'नीतिशतक', 'वैराग्यशतक' हे श्लोकसंग्रह असेच तयार झाले. चार वेद आणि सहा वेदांग मिळून 'दहा ग्रंथ' होतात. 'दशग्रंथी' म्हणजे वेदांगांसकट सर्व वेद जाणणारा विद्वान.

**अष्टक**

वैदिक - आर्य गणनापद्धतीत दशमान पद्धती होती, तर द्रविडांनी 'अष्टक'





अनुक्रमणिका

पद्धतीचा अवलंब केला. याचमुळं ऋग्वेदाची एकूण आठ 'अष्टक' पाडण्यात आली. प्रत्येक अष्टकात आठ अध्याय असतात. जगद्-वन्द्य अशा पाणिनीच्या व्याकरण ग्रंथाचंही नाव आहे 'अष्टाध्यायी' (Grammar in Eight Chapters) पालि सुत्तनिपातातही 'अट्ठक-वग्ग' (अष्टक-वर्ग) आहे. आठांच्या पटीत मोजणी सुरू झाल्यानं आठाच्या पुढच्या आकड्याला 'नवीन' या अर्थानं 'नव' असा शब्द वापरला जाऊ लागला. आठाच्या पाढ्याला एकूणच प्राचीन भारतीय साहित्य-संस्कृती-जीवनात फार मोलाचं स्थान प्राप्त झालं. षोडशकल पुरुष, षोडषोपचारयुक्त पूजा, सांख्यांच्या प्रकृतीचे चोवीस विकार, बत्तीस अक्षरांचा एक 'ग्रंथ'. अशा किती ग्रंथांचं (म्हणजे बत्तीस अक्षरांच्या पटीचं) 'अर्थशास्त्र' वा 'कामशास्त्र' आहे हे सांगण्यात येऊ लागलं. ही संख्या फार मोठी असल्यानं आणि या परिमाणाबाबत अनभिज्ञ असल्यानं 'इतक्या इतक्या संख्येचे या शास्त्रावरील ग्रंथ आमच्याकडे होते, पण काळाच्या उदरात गडप झाले' - असं उगीचच दुःख होऊ लागलं. महापुरुषाची लक्षणंही 'बत्तीस'. कथासंग्रहाच्या 'बत्तीशी' झाल्या. कलांची संख्या चौसष्ट झाली. एकूण हा सर्व आठाचा पाढा आहे. या आठाच्या समूहापर्यंत प्राचीन द्राविड कसे आले हे समजणं फार अवघड नाही. ऋग्वेदातील अनेक प्रार्थनांमध्ये 'शं नो भवतु द्विपदे शं चतुष्पदे' अशी शब्दयोजना येते. प्राणी हे मुख्यत्वे 'द्विपाद' (माणसं) व चतुष्पाद (जनावरं, गुरं) असतात हे त्यांनी पाहिलं. 'द्विपाद' जितका सहजपणे घसरतो तितका 'चतुष्पाद' घसरत नाही. म्हणून 'चतुष्पाद' या स्थिरत्वदर्शक कल्पनेला महत्त्व आलं. तो मूळ घटक (unit) ठरल्यानं 'पाद' याचा अर्थ 'पाव' किंवा $\frac{१}{४}$ झाला. 'आठ' अक्षरांच्या चार चरणांचा अनुष्टुभ लोकप्रिय झाला. पुढे चतुष्कात सर्वसमावेशकता ही कल्पनाही येऊन बसली. त्यामुळे आंग्लभाषेतील 'square food' सारखी 'चौरस' आहाराची कल्पना आली. या चौरसपणाची दुप्पट केली की 'द्विर्बद्धं सुबद्धम्' असं समाधान प्राप्त होऊ लागलं. इथेच खरा तर 'आठा'चा जन्म झाला. संस्कृत व्याकरणाच्या दृष्टीनं हे लक्षात घेणं आवश्यक आहे की 'अष्टौ' (आठ) हे जुन्या वैदिक भाषेतलं द्वि-वचन आहे. याचा अर्थ त्याच्या मूळ प्रातिपदिकाचा (*अष्ट) अर्थ 'चतुष्क' असा असावा. शार्मण्य - भारतीय (Indo - Germanic) *octou हे रूप चतुर्मान पद्धतीचंच द्योतक आहे. अवेस्तातील रूप 'अश्त' असं आहे. लॅटिनमध्ये 'octo असल्यानं 'अष्टम्भर' October, नवम्भर November, दशम्भर December अशी महिन्यांची नावं स्पष्ट होतात. 'आठ' म्हणजे 'दोनदा चार' असा अर्थ होत

असल्यानं धम्मपद - अट्ठकथेमध्ये (१.२१३) आठ मृत व आठ जिवंत कोंबड्यांच्या देणगीचा उल्लेख येतो. राजाच्या देणगीत 'सर्वाष्टक' (सब्बट्ठक-सर्वाष्टक) असावे लागते. आठ हत्ती, आठ घोडे, आठ दास असे सर्व देय पदार्थ आठ आठ असतात. बौध्द संघाला आठ शलाकाभक्तांचे जेवण दिल्याचे उल्लेख येतात. (विमानवत्थु अट्ठकथा ७५ = धम्मपद अट्ठकथा ३.१४) मणी वा रत्न आठ पैलू पाडलेले (अट्ठंस - अष्टांश; अट्ठवङ्क - अष्टावक्र) असतात.

**अष्टादश (१० + ८ = १८)**

दशमान ही आर्य गणनारीती व अष्टक ही द्राविड गणनारीती यांच्या एकत्रीकरणामुळं 'अठरा' या संख्येला भारतीय विचारपद्धतीत महत्त्व (importance) व पावनत्व (sanctity) प्राप्त झालं. पुराणं अठरा (अष्टादश पुराणानि), महाभारताची मुख्य पर्वे अठरा, भगवद्-गीतेचे अध्याय अठरा, भारतीय युध्दातील अक्षौहिणी अठरा (पांडवांच्या सात व कौरवांच्या अकरा : ७ + ११ = १८), प्रमुख उपनिषदे एकतर अठरा (१० + ८ = १८) नाहीतर मुक्तिकोपनिषदानं दिलेल्या आकड्यानुसार (१० वर ८ = १०८) एकशे आठ. कुठून का होईना दहा व आठ या आकड्यांची गाठ पडायला हवी. टीकाकार या बेरजेत निष्णात झाले. मुण्डकोपनिषद् म्हणते (१.२.७.) 'अष्टादशोक्तं अवरं येषु कर्म' अवर कर्म म्हणजे यज्ञकर्म 'अठरा' आहे. कसं? टीकाकार म्हणतो हे 'कर्म' सोळा ऋत्विज, यजमान व यजमान-पत्नी यांच्याकडून होतं म्हणून (१६ + १ + १ = १८). माझे विद्वान स्नेही सॅन सरीन (San Sarin) यांनी इटलीतील तुरीन शहरात अकराव्या जागतिक संस्कृत परिषदेत एक फार सुंदर लेख वाचला (हा लेख या अधिवेशनाच्या लेखसंग्रहात प्रसिध्द होईल. जिज्ञासूंनी आवर्जून वाचावा.) त्यातील एका भागात त्यांनी फार गमतीदार पद्धतीनं शेवटचं शून्य हे गाळून आकड्यांची निव्वळ बेरीज करायला सांगितली. त्यातला वानगीदाखल भाग येथे देतो.

एक अक्षौहिणी म्हणजे २१८७० रथ, २१८७० हत्ती, ६५६१० घोडे, १०३५० पदाति. या आकड्यांतील शेवटचे शून्य सोडून सरळ गणना केली तर

२ + १ + ८ + ७ = १८

६ + ५ + ६ + १ = १८

१० + ३ + ५ = १८

**कोटी**

दशमान या आर्य व अष्टक या द्राविड संख्यामापनाप्रमाणेच भारतात एक तिसरी अंकमापन पद्धतीही होती. ही ऑस्ट्रिक (दक्षिणदेशीय) पद्धत होती. ती वीस हा घटक मूळ धरते. थोडक्यात आर्यांनी केवळ हाताचीच बोटे मोजली तर या जनसमूहानं हातांबरोबर पायांचीही बोटं मोजली. कोल-जमातीत 'वीस' या घटकसंख्येसाठी शब्द आहे 'कोटी' ('crore' नव्हे; ' score'). द्राविड 'कोटि' पासून हिंदी 'करोड' सं. 'कोटिः' व प्राकृत 'कोड़ी' हे शब्द आले. एक वेळ संख्यादृष्ट्या कोटि' ही 'हद्द' मानली जात असावी. या ऑस्ट्रिक 'कोटि' पासून हिंदीत 'कोडी' (कवड्या) व बंगालीत 'कुडि, असे 'वीस' या घटकासाठी शब्द आले आहेत. इंग्लिश 'score' याचा मूळ अर्थ कापणं, तोडणं असा आहे, याचा अर्थ विसाचा 'एक तुकडा' तोडत असावेत.

• **तीन - तिरु (श्री)**

१०, ८, २० याप्रमाणेच तीन या आकड्याला भारतीय सांस्कृतिक भाषेत एक विशिष्ट स्थान आहे. म्हणतात मूळ 'तीन' वेद होते (त्रैविद्याः, त्रयी) अथर्वामुळे ते 'चार' झाले; मूळ 'तीन' वर्णच होते (त्रैवर्णिक) पण शूद्रांच्या अन्तर्भावामुळे 'चार' वर्ण (चातुर्वर्ण्य) निर्माण झाले. मूळ 'तीन'च आश्रम (जीवनावस्था) होत्या; बौद्ध-जैन प्रभावामुळं 'संन्यास' हा चतुर्थ-आश्रम आला व त्यामुळंच त्याच्यासाठी 'तीन आश्रमांबाहेरील' या अर्थानं '<u>अत्याश्रमी</u>' असा शब्द संस्कृतात दाखल झाला. लोकशास्त्रातील (cosmology) त्रि-लोक-सांख्यपरिभाषेतील त्रि-गुण व आयुर्वेदातील त्रि-दोष या कल्पनांमुळेही 'त्रि' (तीन) या संख्येला महत्त्व आलं. आर्यभाषेतील 'श्री' या पदाचं भाषान्तर द्राविडी भाषाकुलांत सर्रास 'तिरु' असं होऊ लागलं. 'श्री-पति' > तिरुपति, 'श्री-शैल' > तिरुमलै. वस्तुतः हा 'तिरु' द्राविडी नव्हे. मूळ आर्यभाषेतील 'त्रि'चेच ते रूप आहे. 'त्रि' यालाच (त्रि-मूर्ती वगैरे कल्पनांमुळे) 'पवित्र', संपन्न, आदरणीय' असा अर्थ प्राप्त झाला.

**त्रि-दण्डी व त्रि-पुण्ड्र**

त्रिदंडी संन्यास प्रसिद्ध आहे. सुभद्राहरणाच्या आधी अर्जुन त्रिदण्डी संन्यासी झाला होता. 'दण्ड' शब्दाचा सामान्य अर्थ घेऊन 'एकत्र बांधलेले तीन दण्ड हातात घेणारा यती' असा अर्थ लावला जातो; पण अर्धमागधी जैन साहित्यात 'कर्म' या अर्थानं 'दण्ड' हा शब्द वापरला जातो. मनुस्मृतीतही या विशेष भ्रमणपरंपरेतल्या

पारिभाषिक अर्थानं वाणी, मन व शरीर यांना तीन दण्ड म्हणून संबोधलं गेलं आहे.

"वाग्दण्डोऽथ मनोदण्डः कायदण्डस्तथैव च ।
यस्यैते निहिता बुद्धौ त्रिदण्डीति स उच्यते" ॥ (मनु.१२.१०)

शैव संप्रदायात कपाळावर गंधाच्या किंवा भस्माच्या तीन आडव्या रेषा ओढून त्यामध्ये बिंदू लावतात. ॐकारातल्या 'अ' 'उ' व 'म' या तीन मात्रांचं हे प्रतीक समजण्यात येतं. अनेक बौद्ध लेण्यांत दगडाच्या एकाखाली एक अशा तीन रेषांची आकृती दिसते. ती बुद्ध, धर्म व संघ या त्रि-रत्नांची द्योतक समजली जाते. एकाखाली एक रेषा ही प्राचीन भारतीय अंकलिपी आहे तर एकापुढे एक रेषा I, II, III ही रोमन अंकलिपी आहे.

**'छपन्न' व 'चौदावे' रत्न**

'त्या दोघांच्यात छत्तिसाचा आकडा आहे' हा प्रकार लेखन पद्धतीवरून सहज कळून येतो, देवनागरीतील ३ व ६ या ची 'तोंडं' एकमेकांविरुद्ध आहेत. पण तुझ्यासारखे 'छपन्न' पाहिलेत म्हणजे काय? 'पन्नास अधिक सहांचा' याच्याशी काहीही संबंध नाही. मूळ प्राकृत 'षट्प्रज्ञ' (सहा प्रकारची प्रज्ञा असणारा) याचं हे रूप आहे. एखाद्याला 'चौदावं रत्न' दाखवायचं म्हणजे तरी काय? हिंदू-परंपरेत 'लक्ष्मी, कौस्तुभ, पारिजातक' अशी चौदा रत्नांची कल्पना आहे. पालि-बौद्ध साहित्यात चक्क (चक्र), हत्थि (हस्ती), अस्स (अश्व), मणि, अशी सात रत्न सांगितली जातात. जैन - अर्धमागधी साहित्यात 'चुद्दस (चतुर्दश) रयणाइं (रत्नानि)' सांगितली आहेत व त्यांतलं चौदावं रत्न आहे 'दण्ड' (शिक्षा) या 'दण्डा'चाच अभिप्राय बहुधा मराठी वाक्प्रचारात असावा.

**अब्ज व लक्ष**

'अप्-ज' म्हणजे 'जलज' कमळ. पण हा शब्द एका प्रचंड मोठ्या संख्येचा वाचक कसा झाला? भाषाशास्त्र विशारदांचं स्पष्टीकरण एवढंच राहणार की 'प्रचंड मोठ्या संख्येनं कमळं उमलवणारी सरोवरच' याला कारण असणार. नुकतेच दिवंगत झालेले संस्कृतविद्याविशारद पॉल थिम 'लक्ष' या संख्येबाबत असं सुचवतात, की पूर्व जर्मनीतील सामन नावाचे तांबडे मासे प्रचंड मोठ्या थव्यांनिशी आढळतात. या माशांचा वाचक lacs हा शब्द या संख्येला प्राप्त झाला आहे. तोखादियन भाषेतही त्यांना या कल्पनेला आधार मिळाल्याचं ते म्हणतात. हे एक मत झालं. संस्कृतात 'लक्ष' हे पद 'लक्ष्य' (नेम-निशाण target) या अर्थानंही वापरलं जातं. ग्रासमान याचा संबंध 'लग्' या धातूशी जोडतात. जुगारात




अनुक्रमणिका

'लावलेल्या' रकमेला हिंदीत हलक्या लोकांच्या बोलण्यात आजही हा शब्द वापरला जातो. 'लगी बीसकी (बाजी)' 'वीस (रुपयांची) पैज लागली'. 'लग्गी' असं नामही वापरलं जातं. 'लग्' चा 'to fix' 'जोडणं, नेम रोखणं' असा अर्थ आहे. या 'लग्' सारखा (कदाचित त्याच्याशी संबद्ध) असा 'लक्ष्' असाही धातू आहे. त्याचाही अर्थ नेम धरणं, नेमकं 'लक्षण' सांगणं असा आहे. याच्याशी 'लक्ष,लक्षण, लक्ष्मन्' इत्यादी शब्द संबद्ध आहेत. 'लाक्षा' म्हणजे अलता, तांबडा रंग. हस्तलिखितात चुकून लिहिलेला शब्द 'खोडण्या'ऐवजी त्यावर 'हरताळ' फासला जायचा. लाखाच्या आकड्यासाठी तांबडा रंग वापरत असावेत का? सांगता येत नाही. पर्शियन 'लक्', हिंदी 'लाख', संस्कृत 'लाक्षा' या सगळ्यांचा ऐतिहासिक संबंध असावा असं निश्चित वाटतं. पण हा संबंध आजमितीला समाधानकारक रीतीनं उलगडत नाही हे खरं आहे. या सगळ्या प्रकारात लक्ष्मीचं भाग्य बाकी थोर! ती अगदी पारदर्शक स्वरूपात सौंदर्यप्रसाधक Lakme, या नावात आपलं 'रूप' प्रकट करते. एखादा शब्द अंकवाचक आहे की विशेषण आहे हे नेमकं न कळल्यानं ऐतिहासिक वस्तुस्थिती कित्येकदा नीट उमगत नाही, 'नव-नन्दाः' हे याचं फार नामी उदाहरण आहे. प्राचीन ग्रंथातील 'नव-नन्दाः' हा संदर्भ पाहिल्यावर निरनिराळे इतिहासकार निरनिराळ्या आकर-ग्रंथातून नऊ नन्दांच्या याद्या घेऊन आले. 'धननंद, पद्मनंद' असे नऊ नन्द कोणी आणले, तर इतर काही इतर नऊ नन्दांची यादी घेऊन आले. अखेर वासुदेव शरण अग्रवाल यांना या सर्व उत्साही संशोधकांना सांगणे भाग पडले की "बाबांनो 'नव-नन्दा' म्हणजे नऊ नन्द नव्हे, तर 'नवीन नन्द घराणे' (New Nanda dynasty) या आधीच्या घराण्याला 'पोराणा नन्दा' असे पालिमहावंस ग्रंथात म्हटले आहे. ते होते 'जुने नन्द घराणे' (Old Nanda dynasty) असो 'दहा अधिक आठ अठरा' याचा प्रपंच करताना इतर बऱ्याच अंकांचा आपण विचार केला. भारतीय गणना पद्धतीतील परार्ध या सर्वाधिक संख्येत एकावर अठरा शून्ये येतात हे लक्षात आल्यावर 'दहा न् आठ अठरा' या आर्य-द्रविड समन्वयाचं उत्तम भान आपल्याला येऊ शकेल.

■

**'यशोदीप'-व, ज्ञानल मंगल कार्यालयाजवळ,**
**सदाशिव पेठ, पुणे - ४११ ०३०.**








**भाषा निरीक्षण**

# हिंरादी, इंग्राठी वगैरे

**मनोहर राईलकर**

मराठीच्या अनेक बोली आहेत, असं तज्ज्ञ मंडळी म्हणत असतात आणि काही तज्ज्ञ मंडळींनी मराठीच्या बोलींची गणतीही केली आहे, असं इतर काही तज्ज्ञ म्हणतात. म्हणोत बापडे, पण त्यांनाही माहीत नसलेल्या (अचूक बोलायचं तर 'नसाव्यात अशा') काही बोलींचा शोध आम्हांला लागला आहे, काही तज्ज्ञांना ह्या बोलींची जाणीव असेलही. तरीही त्यांनी ह्या बोलींकडे आणि त्यांच्या वर्गीकरणाकडे म्हणावं तसं लक्ष दिलं आहे, असे दिसून येत नाही. म्हणून ह्या बोलींचा पद्धतशीर अभ्यास करावा असं आम्ही म्हणतो आहोत. माटेसर आज असते तर त्यांनी आणखी चांगल्या तऱ्हेने अभ्यास केला असता आणि भाषाभिवृद्धीला नवीन दृष्टी दिली असती. असो. वर आम्ही दोनच बोलींचा उल्लेख केला आहे. पण आजकाल महाराष्ट्रात, वाघिणीचे दूध (अती) प्यालेली शिक्षित मंडळी मराठीच्या असल्याच बोलींमधून बोलतात आणि काहीजण लिहितातसुद्धा. बोलींचे आम्हांला आढळलेले आणखी प्रकार असे : हिंराठी, इंरादी, इंराठी, इंराजी, (ह्या शब्दाचं वाचन, ही बोली बोलणारे लोक, संसार ह्या शब्दाचं वाचन जसं सन्सार करतात तसं (म्हणजे इंद्राजी असं) करणार नाहीत अशी आशा आहे (किंवा तसंच करतील अशी भीती आहे, असं म्हणणं वस्तुस्थितीला अधिक धरून होईल) इत्यादी, काही वेगवेगळ्या छटा आढळतातही. काही चाणाक्ष वाचकांच्या आणि संशोधकांच्या आता हे प्रकार लक्षात आलेच असतील. मराठी भाषेवर हिंदीचा असर कितने पैमाने पर पडलाय किंवा इंग्रजीचा इफेक्ट व्हॉट प्रपोर्शनमध्ये पडलाय, यानुसार त्या बोलींची नावं बदलतात. तरीही हे झाले केवळ काही स्थूल वर्ग. सूक्ष्म दृष्टीनं पाहिलं तर याबाबत आणखीही काही वर्गीकरण शक्य आहे, असं विचारांती आमचं मत झालं आहे. त्याविषयी नंतर ऊहापोह केला आहे.

पूर्वी बहुतेक शिक्षित लोक इंग्रठी बोलीत बोलत असत. अलीकडे वेगवेगळ्या

बोलींत बोलणारे लोक आढळतात. हिंरादी, हिंराठी, इ. तूर्त ह्या बोलीतील नमुनेच आम्ही आपल्याला पेश करू इच्छितो. हे वाक्य लिहितानाही आम्ही आपल्याला ह्या बोलीची एक झलक पेश केली असल्याचं आपण पहिचानलंच असेल. तरीही सहज लक्षात यावं म्हणून आम्ही ह्या बोलीतले खास शब्द जाणकारांच्या लक्षात यावेत म्हणून ते ठळक दाखवण्याची कोशिश करणार आहोत.

तर ह्या बोलींमध्ये कुणी कुणाला मदत करायची असेल तर **योगदान** देतो आणि पाठिंबा द्यायचा असेल तर तो त्याला **समर्थन** देतो. पण तसे समर्थन देणारे लोक फार थोडे असले तर (आणि जास्त असले तरी) त्याचे दुश्मन लोक बोलतात, 'अं:! **इनेगिने लोग समर्थन** देत आहेत, झालं. ह्या भाषेत कार्यक्रम **संपन्न** होतात आणि नव्या ग्रंथांचा प्रकाशन समारंभ न होता **विमोचन समारोह** होतो. (कदाचित ते ग्रंथ' .... न दातव्यम्' असं तर म्हणत नसतील?) अलीकडे अपघातातील मृतांची संख्या देण्याऐवजी **मृतकांची** संख्या दिली जाते.

ही बोली बोलणारे लोक संसार करीत नाहीत, तर ते घरगृहस्थी करीत असतात. त्यामुळं ते परस्परांची अंडीपिल्ली बाहेर न काढता भांडाफोड किंवा पर्दाफाश करतात. आपल्याला एखाद्या कार्याला बोलावण्याकरता ते लिहितात, 'आपली उपस्थिती प्रार्थनीय आहे' आणि आपल्या उपस्थितीमुळे त्यांचं कार्य, सिद्धीस जात नाही तर संपन्न होतं. त्यांच्या कामात विघ्न आणायचं असलं तर ते त्यावर पाणी ओतत नाहीत तर पाणी फेरतात. कुणी काही तर्कदृष्ट विधानं करून आपले मुद्दे पटवून द्यायचा प्रयत्न करीत असेल तर ह्या बोली बोलणारे लोक म्हणतात, 'उगीच घिसेपिटे निष्कर्ष काढताहेत'. लाच घेताना पकडल्याची बातमी देताना ते लिहितात, 'पोलिसांनी अमुक अमुक अधिकाऱ्याला रंगेहाथ (त नव्हे, थ) पकडलं'. फिलहाल, इतकी उदाहरणं पुरेशी आहेत नं? नाहीतर हे लोग म्हणतील काय बकबक (किंवा बकवास) करतोय!

संगीताच्या कार्यक्रमाचं परीक्षण करताना इंग्राठी बोली बोलणारे लोक म्हणतात, 'इंडियन म्युझिक पॉप्युलर करायचं असेल तर अशा कार्यक्रमांत सेमीशास्त्रोक्त म्युझिकही इन्क्लुड करावं.' कारण ते महाराष्ट्रीय नसून महाराष्ट्रीयन असतात. दूरदर्शन पाहण्याकरता हे लोक दर्शक होतात. बाय द बाय सेमीशास्त्रोक्त हा शब्द मग्रजी भाषेतही आढळतो बरं का.

एका कॉंपिटिटरचा इंटरव्ह्यू दूरदर्शनच्या एका चॅनलवर एक ॲक्टर घेत होता. त्यावर उत्तर देताना तो कॉंपिटिटर काय म्हणत होता ते ऐकण्या (आता

पाहण्या) सारखं आहे. तो म्हणत होता, 'इंटरस्कूलमध्ये माझं फोर टाईम्स सिलेक्शन झालं आणि वन टाईम गोल्ड मिळालं. कारण त्या वेळी मला कोणी कॉंपिटिटर नव्हता. ज्याच्याशी हार्ड टसल द्यावी लागेल.'

नवीन झी-चॅनल (ह्या बोलीत वाहिनी शब्द आढळत नाही) सुरू झालं त्या वेळी ही बोली बोलणाऱ्यांनी शुभेच्छा कशा दिल्या ते पाहण्यासारखं आहे. एकजण (कारण ह्यात उभयलिंगी शुभेच्छादायकांचा अंतर्भाव होतो तेव्हा 'तो' मध्ये 'ती'चा अंतर्भाव होतो असं आपण गृहीत धरू. इंग्रजी कायद्यात तसंच आहे म्हणतात.) मला ज्या वेळी अशी शुअरशॉट न्यूज मिळाली की झी आता एक नवीन मराठी चॅनल स्टार्ट करणार आहे, तेव्हा आय वॉज ओव्हजॉइड. नव्या झी चॅनलला ऑल द बेस्ट, ऑन माय बिहाफ आणि ऑन बिहाफ ऑफ माझी फॅमिली.

एक सँपल इनफ आहे नं? ह्या बोलीचा एक फायदा आहे. बोलणारा तो की ती ह्यावर बोलणं डिपेंड होत नाही.

तरीही आणखी काही उदाहरणं देतो. टेलिफोनवरून बोलताना 'तू मला संध्याकाळी कॉन्टॅक्ट कर आणि तुझ्या अराव्हलबद्दल कन्फर्म कर. मग आय विल कम टु रिसीव यू. स्टेशनवर रे'. असं ह्या बोलीत बोलतात. पण, तसं कशाला? हे संभाषणच पहा ना. ते दोन मराठी व्यक्तींमधलं आहे हे सांगायलाच हवं का? कारण मधून मधून त्यांच्या बोलण्यात मराठी वर्ड्स डोकावताना (नाइलाजास्तव - कारण इंग्रजी तरी कुठं तितकंसं चांगलं येत असतं) दिसतील.

'ओहोहो. कमिन, कमिन, व्हॉट ब्रिंग यू ॲट धिस ऑड अवर?'अरे वा! मिसेसनाही आणलंयत वाटतं? आयॅम ओव्हरजॉइड. कमॉन इन. काहीतरी फंक्शन दिसतंय, तुमच्या कॉस्च्युमवरनंच कळतंय. ही टोपी. वहिनींच्या नाकात नथ, पण टायवर टोपी काही वाईट दिसत नाही.'

'हो ना. आमच्या एल्डर सनच्या मॅरेजचं इन्व्हिटेशन द्यायला आलोत आणि असं रिलिजस काही असलं की टोपी हवीच, असं डॅड म्हणाले तेव्हा ....'

'आऽ इज ही सो ग्रोनप? कान्ट जस्ट बिलीव, इतकासा पहिला होता. जस्ट अ चाइल्ड, ॲट दि मोस्ट अ बॉय.'

'इतकासा कुठला? सत्ताविसाचा होईल मार्गेसरात.'

'तुमच्या मॉम कशा आहेत आता?'

'ओ! शीज बेडरिडन. दहा वर्षं झाली.'

'सो सॉरी. बरं. बोला.'

'खरं तर प्रिव्हियस ॲपॉइंटमेंट घ्यायला हवी होती. पण काल मी इतका बिझी होतो, की इट जस्ट स्लिप्ड माय अटेन्शन. आयॅम एक्स्ट्रीम्ली सॉरी. आय होप यू वोन्ट माइंड, काय?'

'नो, नो. नॉटॅटॉल. जस्ट रिलॅक्स, बसा. बसा. हॅव सीट. काय घेणार, म्हणजे व्हॉट डू यू प्रीफर. हॉट की कोल्ड?'

'ओ! धिसीज नो टाइम फॉर एनी फॉर्मेलिटीज.'

'आहोऽ बोलत काय बसलात? मुख्य काम राहूनच जाईल ना.'

'हॅ, हॅ, हॅ, हॅ. आमची बेटर हाफ असल्या कामात नेहमी बरोबर असते. त्यामुळं नो प्रॉब्लेम, एनी वे, हे कार्ड, इंग्रजीतच काढलंय. कसं ग्रेसफुल दिसतं. पण आपलं कल्चर सोडायचं नाही. म्हणून मुहूर्त शब्दही घातलाच बरं का. मुहूर्ता ॲट टेन सेव्हनटीन, अगदी यायचं बरं का. विदाऊट फेल. अदरवाईज....'

'डोन्ट वरी. तुमच्याकडचं पहिलं फंक्शन आणि यायचं नाही? दॅटस् जस्ट इम्पॉसिबल.'

'आहोऽ आणि ते हे सांगा ना.'

'हो, हो. असं होतं बघा आमचं. तर नो प्रेझेंटस् ॲंड नॉट ईव्हन बोकेज. ॲबेसोल्यूटली स्ट्रिक्टली.'

'आता तुम्ही ....ओके. ॲज यू विश. पण लंचचं ...?'

'हे पहा. हार घालण्याचा प्रोग्रॅम शार्प टेन सेवन्टीनला झाला की भटजींना तिकडे काहीही करूद्यात. पण इकडे लंच विल बी रेडी अगदी डॉट हाप पास्ट टेन.'

'मग बरंय. कारण आय हॅव टू रीच ऑफिस ॲट लीस्ट बाय इलेवन. लेटेस्ट बाय इलेवन टेन.'

'बी.शुअ सो वी टेक युवर लीव. ॲंड बी शुअऽ नॉट टु फरगेट.'

'येते हं. आणि वहिनींना पण घेऊन यायचं हं.'

मग आम्ही ह्या भाषांचा आणखी अगदी मायन्यूट स्टडी सुरू केला. (अरेच्चा आमच्या भाषेवरही ह्या भाषांचा इफेक्ट पडायला लागला वाटतं? शेवटी पाण्यात राहून माशांशी वैर करता येत नाही.) आणि त्यांचं वर्णन (३०, २३, ४७) (४०, ४०, २०) असं म्हणजे विजय सतरा-सतरा-सतरा च्या चालीवर असं करू लागलो. गणित आणि सांख्यिकी असा आमचा जोड-विषय असल्याने अशी वर्गवारी करताना आम्हांला फारसे कष्ट पडले नाहीत. तर ही टक्केवारी आहे आणि ती कसली आहे, हे वाचकांच्या लक्षात येऊ लागलं असेलच. फक्त पहिला आकडा कशाचा इत्यादी

सांगितलं पाहिजे.

पण शंका कशाला? तर, पहिला आकडा अर्थातच इंग्रजीचा. कारण ती जागतिक (?) भाषा आहे. दुसरा हिंदीचा, कारण ती देशात सगळे नटनट्या (दिग्दर्शक सांगेल तेव्हाच. कारण, एरवी त्यांना हिंदीही नीटसं बोलता येत नाही, तसंच, मराठी त्यांची मदरटंग असली व तिच्याबद्दल त्यांना एक्स्ट्रीम्ली सॉफ्टकॉर्नर असल्याचं, आणि द्न्यानेश्वरादी सेंट्सबद्दल त्यांना राइटफुल रिस्पेक्ट असल्याचं ते/त्या प्राउडफुली सांगत असले/ल्या तरी त्यांना मुलाखत देताना स्वतंत्रपणे बोलता येत नाही, असा आमचा (दौरदर्शनिक) अनुभव आहे) बोलतात. तेव्हा तिचं महत्त्व केव्हाही अधिक (हे असंच ठेवा) आहे, आणि तिसरी भाषा कोणती हे काय सांगायला पाहिजे? आणि आता पहिली भाषा पहिलीपासून शिकवायची (च) असल्यानं हळूहळू पहिल्या आकड्याची वाढ, परिणामतः तिसऱ्याची घट होणार हे सांगायलाच नको. (वास्तविक आपल्याकडे अभिमन्यूची कथा सर्वांना माहीतच आहे.) तेव्हा माझी सरकारला सूचना आहे की गर्भवतींकरता खास शाळा सुरू कराव्यात आणि तेव्हापासूनच बालकांना इंग्रजी शिकवावं.

ज्या वेळी माझे हे विचार मी खाजगीरीत्या बोलून दाखवत होतो तेव्हा एका परिचित तज्ज्ञांनी मला विचारलं, ‘असे सूक्ष्म विभाग केले तर बोलींचे किती प्रकार होतील?’ त्यांनी माझा गण.... आणि संगणक हा लेख वाचला असावा. त्याचं कुतूहल शमवण्याकरता मी जंत्री केली आणि गणितानं त्याचं उत्तर काढलं. कोणतीही भाषा १ टक्का तरी असलीच पाहिजे, असं (नाइलाजास्तव) गृहीत धरलं होतं. तर असे एकूण ४८५१ प्रकार होतील आणि अधिक सूक्ष्म विचाराकरता आपण हजार भाग केले आणि कोणतीही भाषा एकसहस्रांश तरी असली पाहिजे, हे मान्य केलं तर ४,९८५,०१ प्रकार होतील! पुरेसे आहेत ना? (कसं काढलं, ते विचारू नका. माझ्यावर विश्वास ठेवा.)

शेवटी माधव ज्यूलियनांची क्षमा मागून एक कविता सादर करून हा लेख संपवतो.

मराठी असो आमुची मायबोली असो आजला राजभाषा इथे ।
नसे आज ऐश्वर्य या माउलीला, पुढेही तरी तीस आशा कुठे ॥
हिचे पुत्र आम्ही हिचे वस्त्र फाडू, करी घेऊनीया सुरी इंग्रजी ।
जगन्मान्यता का? नको ती मराठी, स्वधामी हवी आजही इंग्रजी ॥
अहो ज्ञानदेवे मराठीपुढे तुच्छ लेखीयले स्वर्गिच्या अमृता ।








किती ते अभागी, कुठे चाखिले वा कुठे देखिले इंग्रजी अमृता ॥
कुठे तट्टिणी ती मराठी, कुठे इंग्रजी श्रेष्ठ आणीक ऐरावती ।
जिला मान्यता पंचखंडांत आहे अशी भव्य अन् दिव्य विद्यावती ॥
हवी इंग्रजी हो, अम्हा इंग्रजी द्या, सदाचे असू आम्ही भिक्षेकरी ।
मराठी भिकारीण? राहो भिकारीण आम्हां तिची काय मातब्बरी ॥
पुढं लिहायचा धीर होत नाही. तेव्हा क्षमा कराल ना?

■

'मृण्मयी', ५६ जेधे नगर, बिबवेवाडी, पुणे - ४११ ०३७

**भाषा वार्ता**

## भाषा अधिकार समिती

महाराष्ट्र शासनाने अलिकडेच ११वी-१२वीच्या अभ्यासक्रमात 'माहिती-तंत्रज्ञान' (हा मुळातला ऐच्छिक विषय) मराठी-हिंदी-गुजराती इत्यादी आवश्यक विषयांऐवजी पर्याय म्हणून अचानकपणे परिपत्रक काढून आणला. यासंबंधी ठिकठिकाणांहून अनेकांनी तीव्र प्रतिक्रिया व्यक्त केल्या. सप्टेंबरच्या प्रारंभी मुंबईमध्ये प्रा. गंगाधर गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली मुंबई मराठी मराठी ग्रंथसंग्रहालयात एक सभा घेण्यात आली होती. मराठीची महाराष्ट्रात उपेक्षा करणाऱ्या महाराष्ट्र शासनाच्या या कृतीबद्दल अनेकांनी नापसंती तीव्र शब्दात व्यक्त केली. मराठी संबंधी काम करणाऱ्या साहित्य संस्था, ग्रंथालये, जागतिक मराठी परिषद, मराठी विज्ञान परिषद अशा अनेक संस्था आणि अशा सर्वांनी यापुढे सामुदायिकपणे कृती केली पाहिजे असा विचार या वेळी मांडण्यात आला. या बाबातीत अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाने पुढाकार घेऊन निमंत्रक संस्था म्हणून जबाबदारी पार पाडावी असे सुचविण्यात आले. महामंडळाने हे काम स्वीकारले असून लवकरच मुंबईत एक समावेशक बैठक भरवून मराठी माणसांची भूमिका प्रातिनिधिक स्वरूपात शासनास कळविण्याचे ठरले आहे. ■



अनुक्रमणिका








# काव्यसमीक्षेची परिभाषा : काही निरीक्षणे

नीलिमा गुंडी

कोणत्याही ज्ञानक्षेत्राची स्वतःची अशी परिभाषा असते. पारिभाषिक संज्ञांमुळे अर्थनिर्णयनाचे काम काटेकोरपणे होते. त्यामुळे ज्ञानक्षेत्रात आवश्यक ती तार्किक सुसूत्रता येण्यास मदत होते. साहित्यसमीक्षेच्या क्षेत्रातही अशाप्रकारे स्वतंत्र परिभाषा योजलेली असते. साहित्यातील प्रचलित संकल्पना नेटकेपणाने शब्दबद्ध करणे, नव्या संकल्पना घडविणे, वाचनव्यवहारामुळे रसिकांच्या मनात घडणाऱ्या सूक्ष्मातिसूक्ष्म प्रतिक्रियांचा वेध घेणे, निर्मितिप्रक्रियेतील जटिल, रहस्यपूर्ण अशा अंगांचे मर्म शब्दांकित करणे, साहित्यातील विविध प्रकार-उपप्रकार यांची व्यवस्था लावणे, तसेच साहित्याच्या मूल्यमापनासाठी आवश्यक ती चौकट उपलब्ध करून घेणे इत्यादी प्रकारची कामे परिभाषेमुळे सुकर होत असतात.

मराठी काव्यसमीक्षेचीही स्वतंत्र अशी परिभाषा अनेक वर्षांच्या कालावधीत सिद्ध झालेली आहे. त्या परिभाषेचा ऐतिहासिकदृष्ट्या आढावा घेण्याचा येथे उद्देश नाही. त्यात ठळकपणे जाणवणाऱ्या काही बाबी लक्षात आणून देणे, हा या लेखाचा मर्यादित उद्देश आहे.

सुरुवातीला मराठी काव्यसमीक्षेच्या परिभाषेवर संस्कृत साहित्यशास्त्राचा विशेष प्रभाव दिसतो. भरताच्या नाट्यशास्त्रातील अनेक संकल्पना - उदा. रस, आस्वाद, भाव इत्यादी मराठी काव्यसमीक्षेने स्वीकारल्या आहेत. रसचर्चा ही मानसशास्त्रातील नव्या संशोधनामुळे पुढे विवाद्य बनली तरीही त्यातील संज्ञा आजही वापरल्या जात आहेत. तत्त्वज्ञान, मानसशास्त्र यांतील संज्ञांचीही योजना समीक्षेत होताना दिसते. आधुनिक साहित्याच्या कालखंडापासून इंग्रजी काव्यसमीक्षेतील संकल्पनांचा प्रभाव वाढत्या प्रमाणात होऊ लागला आहे. परिभाषेचा स्रोत कोणताही असला तरी तिचा मराठीपुरता एक विवक्षित असा अर्थ हळूहळू निश्चित होत जाताना अनेकदा दिसतो. उदा. संस्कृत साहित्यशास्त्रात 'काव्य' ही संज्ञा सर्व साहित्य प्रकारांचा समावेश करणारी व्यापक अर्थाची अशी आहे. मराठीमध्ये मात्र 'काव्य' ही संज्ञा एका विशिष्ट वाङ्मयप्रकारापुरतीच निश्चित झालेली आहे.

काव्यामागील प्रेरणा जसजशा बदलल्या तसतसे नवनव्या संज्ञांची निर्मिती

करण्याचे आव्हान समीक्षेपुढे उभे ठाकले. केशवसुतांनी लिहिलेल्या वेगळ्या वळणाच्या कवितेचे, तिची अशी परंपरेहून वेगळी असलेली ओळख टिपणारे नामकरण करणे गरजेचे होते. तेव्हा 'आधुनिक कविता' हा प्रवाहदर्शक शब्दप्रयोग रूढ झाला. यातील 'आधुनिक' ही संज्ञा 'अर्वाचीन' या निव्वळ कालवाचक संज्ञेपेक्षा अधिक असा मूल्यवाचक अर्थ सुचविणारी होती. प्रत्यक्षात 'साहित्य समीक्षा परिभाषा कोशा'त मात्र आधुनिक आणि अर्वाचीन या दोन्ही संज्ञा 'modern' साठी समानार्थी म्हणून येतात.[१] अशा वेळी समीक्षेतील संकल्पनांच्या कोशाची गरज विशेषत्वाने निर्माण होते. केशवसुतांची कविता modern या अर्थाने 'आधुनिक' ठरल्यावर पुढच्या टप्प्यावरील मर्ढेकरांच्या कवितेसाठी मग 'नवकाव्य' ही संज्ञा पुढे आली आणि अलीकडे पुन्हा एकदा मर्ढेकरांच्या कवितेत Modernism म्हणजे आधुनिकवाद आढळतो, हे नव्याने सांगितले गेले.[२]

आधुनिक काव्यात नवनवे काव्यप्रकार समाविष्ट होत गेले. काव्यप्रकार - उपप्रकार यांचे वर्गीकरण करून व्यवस्थापन करणे, हे समीक्षेचे एक उद्दिष्ट असते. त्यानुसार त्या काव्यप्रकारांचे नामकरण, वर्गीकरण होताना अनेक वाद झालेले दिसतात. विशेषतः इंग्रजी संज्ञेसाठी कोणता प्रतिशब्द योजावयाचा याविषयी मतमतांतरे झालेली आढळतात. उदा. Lyric हा इंग्रजीतील काव्यप्रकार पाहू. Lyric या शब्दातूनच Lyre या ग्रीक तंतुवाद्याची साथ सुचविली जाते. याला समांतर असा प्रतिशब्द घडविण्यासाठी मराठीत बराच खल झालेला दिसतो. १९२० पूर्वी Lyric साठीचे 'वैणिक', 'वीणागीत', 'वीणाकाव्य' हे शब्द वाद्याचा संदर्भ असलेले होते. पुढे हे शब्द रूढ झालेले दिसत नाहीत. श्री. नी. चापेकर यांनी Lyric साठी 'गीतक' ही संज्ञा सुचविली होती.[३] Lyric साठी रा.बा. कीर्तिकरांनी 'लहरी काव्य'/'तरंगकाव्य'[४] तर पु.मं. लाड यांनी 'मुक्तक'[५] या संज्ञा सुचविल्या होत्या. शेवटी Lyric साठी भावगीत ही संज्ञा मुख्यतः रविकिरणमंडळाकडून वापरली गेलेली दिसते. Sonnet साठीही सुरुवातीला चतुर्दशक, गीतिका[६] स्वनित[७] (स्वन्' या धातूपासून बनलेला शब्द) अशा संज्ञा सुचविल्या गेल्या आहेत. (Sonnet चे मराठीत नामकरण हा विषय तर केशवकुमारांनी 'झेंडूचीं फुलें' मध्ये एक हास्यकारक विषयच करून टाकला आहे!) शेवटी माधवराव पटवर्धन व द.ल. गोखले यांनी सुचविलेला 'सुनीत' (सुष्ठु नीतम्) हा शब्द रूढ झाला. परकीय काव्यप्रकारांचे मराठीत नामकरण करण्याचा हा अट्टहास पुढे कमी झालेला दिसतो. जपानी 'हायकू' मराठीत अनुवादित व स्वतंत्र रूपात येताना 'हायकू' याच नावाने आले, याची येथे आठवण येते.

काव्यप्रकार, काव्यप्रवृत्ती यांतील बदलांमागे खरे तर विशिष्ट कलाविषयक दृष्टिकोन असतो. ज्या 'रोमँटिसिझम'च्या प्रभावातून मराठी काव्याचे रूप बदलत गेले त्या 'रोमँटिसिझम' या संज्ञेसाठी मराठीत आजही पूर्ण समाधानकारक संज्ञा आहे, असे म्हणता येत नाही. रा.शं. वाळिंबे यांनी योजलेली 'स्वच्छंदवाद' ही संज्ञा, तसेच गो.वि. करंदीकरांनी सुचविलेली 'निर्भरशील' (Romantic) ही संज्ञा त्यातील अर्थाच्या सर्व छटा व्यक्त करू शकत नाही. सौंदर्यवाद, रोमांचवाद अशाही संज्ञा वाचायला मिळतात. तरीही अनेकदा मूळ शब्द इंग्रजीतूनच वापरण्याकडे आजही कल दिसतो. या रोमँटिक प्रवृत्तीच्या काव्यात आढळणारे एक वैशिष्ट्य म्हणजे 'Subjectivity'. केशवसुतांच्या काव्याविषयी लिहिताना रा.श्री. जोगांनी या वैशिष्ट्यासाठी 'आत्मलेखन' ही संज्ञा योजली होती. पुढे मात्र त्यासाठी 'आत्मनिष्ठा' ही संज्ञा रूढ झाली. समीक्षा-परिभाषा घडविण्यात स्वारस्य असलेल्या श्री. नी. चापेकरांनी 'आत्मलक्ष्यी' हा सुचविलेला शब्द योग्य होता. तो शब्द आजही रूढ आहे. विशेष म्हणजे आत्मनिष्ठ काव्य हा शब्द जेव्हा Subjective Poetry या अर्थाने रूढ होता, त्याच सुमारास बा.सी. मर्ढेकरांनी आपल्या 'वाङ्मयीन महात्मता' या सुप्रसिद्ध निबंधात sincerity या अर्थाने 'आत्मनिष्ठा' ही संज्ञा योजून टाकली होती!

Romanticism प्रमाणेच Mysticism साठी देखील एकाहून अधिक प्रतिशब्द पुढे आले. गूढवादी काव्य (Mystic Poetry) हा प्रचलित शब्द वापरण्याऐवजी कवी अनिल यांनी सुचविलेली 'प्रतीतिधर्मी काव्य' ही संज्ञा वैशिष्ट्यपूर्ण होती. आपल्या 'फुलवात' (१९३२) या काव्यसंग्रहाच्या प्रस्तावनेत त्यांनी या संज्ञेचे औचित्य स्पष्ट केले आहे. आज ही संज्ञा विस्मरणात जमा झाली आहे. शेवटी उत्पत्ती, स्थिती आणि लय हे चक्र शब्दांनाही लागू असते! रविकिरणमंडळकालीन काव्यातील 'जानपद काव्य' (Pastoral Poetry) ही संज्ञाही आता इतिहासजमा झाली आहे.

प्रतिशब्द योजण्यापेक्षा नव्या संकल्पनांचे शब्दांकन करणे अधिक अवघड असते. येथे त्र्यं.वि. सरदेशमुख यांनी योजलेली 'युगांतक' ही संज्ञा आठवते.[८] त्यांच्या मते गोविंदाग्रज हे 'युगांतक' कवी होते. युगांतक कवीमध्ये समकालीन युगाच्या प्रेरणा सर्व गुणदोषांसकट तीव्रपणे व्यक्त होतात, असे त्यांना वाटते.

नवकाव्याच्या कालखंडातही नवी परिभाषा घडवायला गती येत होती. नवकाव्याचे एक अविभाज्य अंग म्हणजे त्यातील नावीन्यपूर्ण प्रतिमा हे होय. मुळात Image साठी सुरवातीला वा.ल. कुलकर्णी यांनी 'कल्पनाचित्रे' हा शब्द

योजलेला होता. मर्ढेकरांवरील पहिल्या १९४८मधील लेखात त्यांनी काव्यातील कल्पनाचित्रांचा खास उल्लेख केला होता; परंतु मर्ढेकरांवरील १९६० मधील दुसऱ्या लेखात त्यांनी 'प्रतिमा' ही तोवर रूढ झालेली संज्ञा वापरलेली आहे. वा. ल. कुलकर्णी यांनी आपल्या विवेचनात 'घाट' ही संज्ञा काव्यप्रकार या अर्थी नेहमीच योजलेली आहे. आशय आणि अभिव्यक्ती यांतील सेंद्रिय नाते सुचविणारी अस्सल मराठी धाटणीची ही संज्ञा आहे. नवकाव्याच्या रूपवादी समीक्षेत नेहमी येणारी 'आकृतिबंध' ही संज्ञा मात्र बरेचदा चेष्टेचा विषय ठरलेली दिसते. (एका कथेतील भांडणात हा शब्द 'अपशब्द' म्हणून वापरल्याचे वाचलेले आठवते!)

समीक्षेची परिभाषा हा काहींच्या बाबतीत गंभीरपणे करावयाच्या चर्चेचा तर काहींच्या बाबतीत टवाळीचा विषय राहिला आहे. सर्वसामान्य वाचकांना तात्त्विक चर्चेत रस नसतो. त्यांना अशी चर्चा म्हणजे व्यर्थ काथ्याकूट वाटतो. काव्याचा झटिती प्रत्यय आणि आस्वाद यांत त्यांचे समाधान होते. अर्थाची चिकित्सा, सूक्ष्मता, नेमकेपणा यांमुळे आस्वादाला येणारी खोली त्यांना फारशी अपेक्षितच नसते. परिभाषा अकारण क्लिष्ट, आस्वादनात अडथळारूप अशी असल्याची त्यांची तक्रार असते. यात काही अंशी तथ्यही आहे. परिभाषेतील अकारण बोजडपणामुळे अर्थ कधी कधी दुर्बोध बनतो; पण हा दोष परिभाषेचा नसून ती घडविणाऱ्यांचा व योजणाऱ्यांचा असतो. आपल्याकडे पारिभाषिक संज्ञा या अलंकरणासारख्या वापरण्याची प्रवृत्तीही समीक्षेत आढळते. उदा. केशवसुतांना सुरवातीला 'महाकवी' असे म्हटले गेले आहे.[९] अशा वेळी संज्ञांचे अवमूल्यन होत जाते. या पार्श्वभूमीवर रा.भा. पाटणकरांचा 'सौंदर्यमीमांसा' (१९७४) या ग्रंथातील समीक्षेतील पारिभाषिक संज्ञांची तार्किक पातळीवरून चिकित्सा करण्याचा प्रयत्न महत्त्वाचा ठरतो.

काही वेळा प्रखरपणे विरोध करतानाही समीक्षक कवितेला नकळत मदतही करून जातात. याचे उदाहरण म्हणजे नवकाव्याच्या विरोधात लिहिलेला 'मुख्यार्थाची कैफियत' ('चर्वणा'१९६०) हा रा.श्री. जोग यांचा लेख होय. यात मर्ढेकरांच्या कवितेवर टीका करताना शेवटी लेखात जोगांनी नवकाव्यात (Transferred Epithet) संक्रमित विशेषणे आणि (Mixed Metaphor) संमिश्र रूपके वापरलेली आहेत असे म्हटले. नवकाव्याच्या समीक्षेत पुढे हे प्रतिशब्द अगदी परवलीचे शब्द ठरले. त्या प्रतिशब्दांचे जनक असे नवकाव्याचे विरोधक होते, हा योगायोग गमतीदार आहे. काव्यातील बदलाच्या रेट्यामुळे की काय कोण जाणे; पण जुन्या संज्ञा बदलून तेथे नव्या संज्ञा योजण्याचा प्रयत्नही जोगांनी केला होता.

'काव्यविभ्रम' (१९५१) मध्ये त्यांनी अलंकारांसाठी 'स्थितिविभ्रम' आणि वृत्तांसाठी 'गतिविभ्रम' या संज्ञा योजल्या. 'अलंकार' असे म्हणताना काव्याशी असणारे दूरचे नाते या संज्ञांमुळे जवळचे ठरावे, ही त्यांची भूमिका होती; परंतु या संज्ञा स्वीकारल्या गेल्या नाहीत.

काही वेळा संज्ञांचे काहीसे अर्थांतरण होते. मूळ अर्थापेक्षा पुढे ती संज्ञा त्यातील एखाद्या अर्थच्छटेपुरती उरते अथवा अधिक काही सुचवितेही. याचे अगदी अलीकडील उदाहरण म्हणजे 'चारोळी' ही संज्ञा. काही वर्षांपूर्वी चार ओळींच्या काव्याचे संग्रह मोठ्या प्रमाणावर निघू लागले. त्यांना सुरुवातीला चेष्टेने 'चारोळी' म्हटले गेले. वास्तविक केशवकुमारांच्या 'झेंडूचीं फुले' मध्ये चार ओळींच्या विनोदी कवितांना त्यांनी 'चारोळी' असे प्रथम म्हटले आहे. आज मात्र गंभीर अशा चार ओळींच्या कवितांनाही 'चारोळी' असेच म्हणण्याचा प्रघात दिसतो.

नवनव्या शास्त्रांच्या अभ्यासानेही संज्ञांमध्ये भर पडत असते. अलीकडे भाषाशास्त्राकडून काही नव्या संज्ञा समीक्षेत येत आहेत. 'नियमोल्लंघन' ही एक अशीच संज्ञा. काव्यात व्याकरणिक नियमांचा मुलाहिजा न बाळगता कलात्मकतेचे निकष कार्यरत असतात, हे यामध्ये गृहीत तत्त्व आहे. पण 'काव्यात नियमोल्लंघन असते' असे विधान वाचताना 'सरसकट सर्वच प्रकारच्या काव्यांमागे रोमँटिक प्रवृत्तीच असते तर!' असे नकळत मनात येते.

एकंदरीत काव्यसमीक्षेची परिभाषा ही अनेकांच्या व्यासंगातून - चर्चेमधून आणि वाचकांच्या मान्यतेतून आकाराला येणारी गोष्ट आहे. वेगळ्या संवेदनशीलतेतून जन्मणारे काव्य नव्या परिभाषेच्या प्रतीक्षेतच असते. परिभाषेचा सराव झाला की वाचकांनाही समीक्षेचा बागुलबुवा वाटेनासा होतो, पण त्यासाठी समीक्षकांना सर्वसामान्य वाचकांविषयी आस्थाबुद्धी हवी आणि साहित्यव्यवहारात समीक्षेला प्रतिष्ठा हवी. काव्याचे विश्व हे केवळ प्रतिभाशक्तीने तोललेले नसते. त्यात कळतनकळत प्रज्ञेचा सहभाग असतोच. काव्याशी निगडित अनेक पैलू तर्काच्या चिमटीत पकडता येत नाहीत आणि परिभाषा अपुरी पडते. हे घडणारच; पण चांगल्या समीक्षकाला पारिभाषिक संज्ञा उत्स्फूर्तपणे सुचतही असतात, हेही तितकेच खरे!

**तळटीपा**

१) *'साहित्य समीक्षा परिभाषा कोश' भाषा संचालनालय, महाराष्ट्र शासन, मुंबई १९८७, पृ.२९.*

२) *'कवितेतील आधुनिकवाद', केशव सद्रे, शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, २०००.*

३) श्री. नी. चापेकर, 'परागपरिमळ' 'प्रफुल्ल पद्माकर' पाकळी पहिली, औरंगाबाद १९२८, पृ. ५-१८.

४) रा.बा. कीर्तिकर, 'वीणाकाव्य?' 'विविधज्ञानविस्तार', नोव्हेंबर १९२१, पृ. ३७५-३७६.

५) पु.मं. लाड, 'मुक्तक की भावगीत', 'मधुपर्क' मुंबई १९४३, पृ. ७१-९४.

६) रा.प. सबनीस, 'मिल्टनच्या गीतिका', 'विविधज्ञानविस्तार' फेब्रु. १९२४, पृ. ११०-११२.

७) श्री.नी. चापेकर, 'परिचय' 'स्वनितांजलि', संग्रा. वा.वि. वैद्य, कापशीकर, कोल्हापूर १९२६, पृ. १-१६.

८) त्र्यं.वि. सरदेशमुख 'युगांतक गडकरी, 'धुके आणि शिल्प' सन पब्लिकेशन्स, पुणे, पृ. ५-२२.

९) ग.त्र्यं. माडखोलकर, 'केशवसुतांची कविता', 'आधुनिक कविपंचक', पुणे १९२१.

## आधार-ग्रंथसूची


१) अनिल (देशपांडे आ.रा.) 'फुलवात', वाग्विलास मंडळ, पुणे, १९३२.

२) करंदीकर गो.वि., 'परंपरा आणि नवता,' पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९६०.

३) कुलकर्णी वा.ल. 'मराठी कविताः जुनी आणि नवी', पॉप्युलर प्रकाशन, मुंबई, १९८०.

४) केशवकुमार, 'झेंडूचीं फुलें' (संपा. स.गं. मालशे), परचुरे प्रकाशन, मुंबई, आ. ९, १९७४.

५) जोग रा.श्री. 'काव्यविभ्रम', व्हीनस प्रकाशन, पुणे आ. ३, १९७४.

६) जोग रा.श्री. 'केशवसुत' (काव्यदर्शन) प्रका. ढवळे, मुंबई, १९४७.

७) जोग रा.श्री. 'चर्वणा' कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, १९६०.

८) पाटणकर रा.भा. 'सौंदर्यमीमांसा', इस्थेटिक्स सोसायटी व मौज प्रकाशन, मुंबई, १९७४.

९) भिडे ना.म. व आपटे द.अ. (संग्राहक) 'काव्यचर्चा', प्रका. शं.न जोशी, पुणे, १९२५.

१०) मर्ढेकर बा.सी. 'वाङ्मयीन महात्मता', रामकृष्ण प्रकाशन, मुंबई, १९४१.

११) मालशे स.गं. व मालशे मिलिंद, 'साहित्याभ्यासाची शैलीलक्ष्यी पद्धत', मराठी संशोधन मंडळ, मुंबई, १९८१.

१२) रविकिरणमंडळ, 'काव्यविचार', रविकिरणमंडळ, पुणे, १९२४.

१३) वाळिंबे रा.शं., 'साहित्यातील संप्रदाय'' कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, आ. २, १९६६.




३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे - ४११ ००२









## पुस्तक परीक्षण

# मराठीतील पहिला जोडणी-कोश : 'मराठी लेखन कोश'

यास्मिन शेख

('मराठी लेखन कोश' - संकल्पना, कोशरचना, संपादक : अरुण फडके, प्रकाशक : केशव भिकाजी ढवळे, मुंबई. पृष्ठे : ५१२, मूल्य : २५० रु., प्रथमावृत्ती २००१)

श्री. अरुण फडके यांनी सिद्ध केलेला प्रस्तुत कोश हा रूढार्थाने कोश नसून एक महत्त्वाचा 'जोडणी कोश' आहे. महात्मा गांधींच्या प्रेरणेने कितीतरी वर्षांपूर्वी असा कोश गुजरातीत तयार झाला होता. 'जोडणी' (spelling) या अर्थाने गुजरातीत रूढ असलेला शब्द मराठीतही रूढ करता येण्यासारखा आहे. श्री. फडके यांचा 'मराठी लेखन-कोश' हा 'मराठी साहित्य महामंडळा'च्या लेखनविषयक 'नियमांनुसार होणारी शब्दांची विविध रूपे वैशिष्ट्यपूर्ण मांडणीने दाखवणारा मराठी शुद्धलेखन कोश' होय.

खरे पाहता, 'मराठी साहित्य महामंडळा'ने मराठी लेखनविषयक नियम निश्चित केले, त्यापाठोपाठ अशा प्रकारचा लेखन संदर्भ कोश तयार करण्याचा उपक्रम हाती घ्यायला हवा होता. (महामंडळाचे लेखनविषयक चौदा नियम १९६१ साली प्रसिद्ध झाले. १९७२ साली त्या नियमावलीत आणखी चार नियमांची भर घातली गेली.) महामंडळाने तज्ज्ञांच्या साहाय्याने अशा प्रकारच्या कोशाची निर्मिती केली असती, तर मंडळाच्या सदस्यांना श्री. फडके यांना ज्या अडचणी आल्या, त्या – विशेषतः महामंडळाच्या अठरा नियमांत न बसणारे अनेक शब्द, त्यांना होणारे सामान्यरूपादी विकार इ. – लक्षात आल्या असत्या आणि लेखनविषयक नियमांत योग्य ते बदल करण्याची किंवा भर घालण्याची आवश्यकता भासली असती.

सुमारे चाळीस वर्षांपूर्वी जे काम महामंडळातर्फे व्हायला हवे होते, ते काम श्री. अरुण फडके यांनी स्वखुषीने, एकहाती, अत्यंत परिश्रमपूर्वक आणि मराठी भाषेच्या प्रेमातून केले, याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. बावीस वर्षे

मुद्रणव्यवसायात आणि गेली बारा वर्षे आधुनिक तंत्रज्ञानानुसार संगणकीय अक्षर-जुळणीच्या क्षेत्रात ते कार्यमग्न आहेत. मुद्रणशोधनाचा प्रदीर्घ अनुभव त्यांच्या गाठीशी असल्यामुळे, लेखनविषयक नियमांनुसार होणारी शब्दांची विविध रूपे दर्शवणारा एकही कोश मराठीत उपलब्ध नाही, ही उणीव त्यांना प्रकर्षाने भासली. त्यातून त्यांना प्रस्तुत लेखनकोश करण्याची प्रेरणा मिळाली. आजची शुद्धलेखनविषयक परिस्थिती लक्षात घेता मराठी लेखन करणाऱ्यांना व ते तपासणाऱ्या मुद्रितशोधकांना अशा तऱ्हेच्या संदर्भ कोशाची नितान्त गरज आहे, हे ओळखून श्री. फडके यांनी या कोशाची निर्मिती केली आहे. सर्व मराठी शिक्षणसंस्थांतून, वृत्तपत्रीय संस्थांतून, मराठी प्रकाशनगृहांतून, शासकीय कार्यालयांतून, दूरचित्रवाणीच्या सर्व मराठी वाहिन्यांतील लिखित मजकूर तयार करणाऱ्या विभागांतून, खेड्यापाड्यांतून एक महत्त्वाचा व अत्यंत उपयुक्त संदर्भ कोश म्हणून या कोशाचा प्रचार व प्रसार होणे अत्यंत अगत्याचे आहे. किंबहुना, जेथे जेथे मराठी लेखन केले जाते, त्या त्या सर्व ठिकाणी हा कोश उपलब्ध व्हायला हवा.

**कोशाचा परिचय**

या कोशात शुद्धलेखनाच्या दृष्टिकोनातून विशेष महत्त्वाचे असे एकूण वीस हजार शब्द त्यांच्या विविध रूपांमध्ये वैशिष्ट्यपूर्ण रीतीने दाखवले आहेत. कोशात अंतर्भूत करण्यासाठी शब्दांची निवड करताना कोशकाराने तीन निकष ठरवले आहेत. (पृ. १६) (यापुढील कंसातील आकडे पृष्ठांक समजावेत.) काही महत्त्वाच्या क्षेत्रांतील, सामाजिक, साहित्यिक क्षेत्रांतील पारिभाषिक शब्द, त्याचप्रमाणे मराठी भाषेत स्वीकारले गेलेले इंग्लिश शब्दही कोशात समाविष्ट करण्यात आले आहेत.

'कोश कसा पाहावा?' या पहिल्या प्रकरणात कोशाच्या सर्वसाधारण मांडणीचे विस्तृत विवेचन केले आहे. सातव्या पानावर आकृतीच्या साह्याने दिलेल्या सूचना जिज्ञासूंना कोशाचा उपयोग करण्याच्या दृष्टीने मार्गदर्शक ठरतील. कोशातील शब्दांची अकारविल्हे मांडणी डॉ. अशोक रा. केळकर यांच्या 'वैखरी' या पुस्तकातील 'मराठीची वर्णक्रमी' या लेखात लेखकाने सुचवल्याप्रमाणे कोशकाराने केली आहे.

**कोशाची वैशिष्ट्ये**

या कोशाची काही वेगळी व महत्त्वाची वैशिष्ट्ये सांगणे आवश्यक आहे.

कोशात एक फार उपयुक्त सोय कोशकाराने केली आहे. मराठी लेखनात लिहिणाऱ्याच्या हातून वारंवार होणाऱ्या चुकांचा ऊहापोह या पूर्वीही अनेक तज्ज्ञांनी आपल्या ग्रंथात केला आहे, पण या कोशात चुकीच्या पद्धतीने लिहिले जाणारे शब्द ज्या प्रकारे नोंदवले आहेत, ते कोश पाहणाऱ्याच्या दृष्टीने अधिक सोईस्कर आहेत. चुकीने लिहिला जाणारा शब्द कोशात चौकोनी [ ] कंसात देऊन त्यासमोर X अशी खूण केली आहे व त्या चुकीकडे लक्ष वेधण्यासाठी बोट दाखवणाऱ्या चिन्हाचे चित्र ☛ दाखवले आहे. त्या शब्दाच्या आधी किंवा नंतर (आपापल्या जागी तो शब्द ज्या क्रमाने येईल तेथे) त्या शब्दाचे योग्य लेखन व त्यापुढे ✓ अशी खूण दाखवली आहे. शिवाय, अशा शब्दातील चुकीचे अक्षर / अक्षरे अधोरेखित केली आहेत. या सोईमुळे ज्या शब्दांचे चुकीचे लेखन वारंवार होते, अशा शब्दांकडे जिज्ञासूंचे लक्ष वेधले जाते. उदा.- डहाळी X☛ पाहा डाहळी (१९६) डाहळी (स्त्री.) [डहाळी X]☛ [डाहाळी X] ☛ (१९७)

दुसरे, एखाद्या शब्दाचे लेखन चुकीचे पण अत्यंत रूढ झाल्यामुळे मान्य झालेले असले, तर तशी नोंद करून 'प्रयोगशरणाः वैयाकरणाः' या न्यायाने कोशकाराने तो शब्द स्वीकारला आहे. (असे दोन/तीनच शब्द कोशकाराने नोंदवले आहेत.) अशा शब्दांची नोंद कोशात पुढीलप्रमाणे केली आहे -

'वर्तुळ (न) [चूक, परंतु रूढ शब्द]

पाहा वर्तूळ'. त्यापुढे वर्तुळ या शब्दाची विविध रूपे दिली आहेत.

त्यानंतर वर्तूळ (न) हा बरोबर शब्द देऊन त्याची रूपे दिली आहेत.

**कोशातील शब्दांची मांडणी पुढीलप्रमाणे आहे.**

कोशकाराने शब्दांचे दोन विभाग केले आहेत. (१) क्रियापदेतर शब्द (२) क्रियापदे.

(१) पहिल्या विभागात मूळ शब्द, त्याची जात, त्या शब्दाचे एकवचनी सामान्यरूप, अनेकवचन, अनेकवचनाचे सामान्यरूप, काही विशिष्ट शब्दांची तृतीया, पंचमी, सप्तमी या विभक्तींचे प्रत्यय लागून होणारी रूपे, 'चा' व 'ला' हे प्रत्यय लागताना सामान्यरूप न होणाऱ्या काही शब्दांची रूपे, काही शब्दांची अनियमित रूपे दिली आहेत, अव्ययांची नोंद वेगळ्या प्रकाराने केली आहे.

(२) दुसऱ्या विभागात मूळ धातू, त्यांची सर्व आख्यात प्रत्ययांसाठी होणारी रूपे, द्वितीय पुरुषी एकवचनी आज्ञार्थी रूपे नोंदवली आहेत. अनियमित क्रियापदांची रूपेही कोशात आढळतात.

कोश तयार करताना श्री. फडके यांना काही अडचणी आल्या. महामंडळाच्या अठरा नियमांत मराठीतील सर्व शब्दांचे, त्यांच्या प्रत्यय लागून होणाऱ्या रूपांचे इ. लेखन बसणे शक्य नाही, हे त्यांच्या लक्षात आले. उदा., ध्वनींचे अनुकरण करणारे शब्द. या शब्दातील ऱ्हस्वदीर्घत्व. ती नामे असल्यास त्याचे कोणते लिंग प्रमाणित मानायचे, याचे उत्तर महामंडळाच्या नियमांत सापडत नाही. उदा. 'कुहूकुहू' बरोबर की 'कुहुकुहु'? कोशकाराने 'कुहुकुहु' असे स्त्रीलिंगी रूप कोशात स्वीकारले आहे. ते स्वीकारताना मोरो केशव दामले कृत 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या ग्रंथाचा कोशकाराने आधार घेतला - (अभ्यस्त शब्द ह्या प्रकरणातील 'अनुकरणवाचक' या मथळ्याखाली दिलेली व्याख्या) व अशा शब्दांतील ऱ्हस्वदीर्घ निश्चित केले. त्याचप्रमाणे संख्यावाचके ही विशेषणे मानली जातात; पण ती नामांप्रमाणेही केव्हा केव्हा योजिली जातात हे लक्षात घेऊन कोशकाराने त्यांची नोंद नाम व विशेषण अशी करून त्यांना होणारे विकार दर्शविले आहेत. शिवाय, जी विशेषणे नामांप्रमाणेही भाषेत योजली जातात, त्यांचीही विविध रूपे कोशात नोंदवली आहेत.

महामंडळाच्या नियमांच्या कक्षेबाहेरील शब्द व त्यांची रूपे यांची नोंद करताना कोशकाराने बारा बाबी विचारात घेतल्या आहेत. (४३,४४) त्या जिज्ञासूंनी अवश्य पाहाव्यात.

**काही विवाद्य मुद्दे**

श्री. फडके यांनी प्रस्तुत कोशाला 'कोश कसा पाहावा'? हे शीर्षक असलेली तेवीस पृष्ठांची विस्तृत अभ्यासपूर्ण व कोश पाहणाऱ्याच्या दृष्टीने उपयुक्त अशी प्रस्तावना लिहिली आहे. (७ ते २९) 'अकारविल्हे' या शीर्षकाखाली प्रस्तुत कोशात स्वीकारलेल्या वर्णक्रमीचे विस्तृत विवेचन आहे.

श्री. फडके यांनी लिहिलेल्या प्रस्तावनेत काही विवाद्य विधाने आहेत, त्यांचा परामर्श घेणे आवश्यक वाटते. काही सूचनाही कराव्याशा वाटतात, हेतू दोषदिग्दर्शन हा नसून पुढील आवृत्ती निर्दोष होण्याच्या दृष्टीने कोशकाराने त्या विचारात घ्याव्यात, हा आहे.

१) रकार या शीर्षकाखाली " 'र्' हे व्यंजन दुसऱ्या व्यंजनाला जोडायचे असल्यास ॱ अशी किंवा ‸ अशी खूण करतात." (३३), या विधानाच्या स्पष्टीकरणार्थ कोशकाराने "छ्, ट्, ठ्, ड्, ढ्' या व्यंजनांत खाली ‸ अशी खूण करावी लागते," असे म्हटले आहे. कोशकाराचे हे स्पष्टीकरण 'ट्' व 'ड्' या

दोन व्यंजनांपुरतेच मराठीच्या संदर्भात खरे आहे. 'पुढेमागे मराठीत 'छ्, ठ्, ढ्, यांना 'र्' हे व्यंजन जोडणारे शब्द आले, तर ती 'छ्र, ढ्र, द्र' अशी लिहावीत,' असे फारतर म्हणता येईल.

**२)** क्रमवाचक विशेषणांचे सामान्यरूप व विशेष्यांप्रमाणे बदलणारी त्यांची सामान्यरूपे यांचा कोशात समावेश करताना कोशकाराने प्रथम 'पहिला ते तेरावा' अशा पहिल्या तेराच विशेषणांची रूपे दाखवली आहेत. "यानंतर एकदम 'एकोणिसावा ते अठ्ठेचाळिसावा' एवढ्या क्रमवाचक विशेषणांची रूपे दाखवली आहेत." (१६)

'तेरावा' नंतरची व 'एकोणिसावा' आधीची क्रमवाचक विशेषणे, शुद्धलेखनाच्या दृष्टिकोनातून त्यांच्या रूपांत काही वैशिष्ट्य नाही म्हणून, दगळायला हरकत नाही; पण कोशकाराने जे कारण दिले आहे ते असे - "..... कारण आपल्या धार्मिक रूढींनुसार या तेरा विशेषणांचा वापर आपल्या व्यवहारात मोठ्या प्रमाणात होतो." हा युक्तिवाद पटणारा नाही. भाषेला धर्म नसतो; ती कुठल्याही एका धर्माची नसते, हे कोशकाराने ध्यानात घ्यावे. कोशकाराचे वरील विधान वाचल्यावर एका घटनेची आठवण झाली. दाते-कर्वे कोश तयार होताना अश्लीलतेच्या संकेताचे पालन करून अश्लील शब्द कोशातून गाळावेत अशी सूचना पुढे आली. तेव्हा दत्तो वामन पोतदारांनी ठासून सांगितले, की हा अधिकार कोशकाराला नाही!

**३)** "धातूंना 'णे' हे कृदन्त लागून धातूंपासून क्रियापदे तयार होतात," असे विधान कोशकाराने केले आहे. (१७) 'णे' हे कृदन्त नसून तो धातूला लागणारा 'प्रत्यय' आहे. मोरो केशव दामले यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरण' या ग्रंथातील 'धातु किंवा क्रिया' या प्रकरणातील पृ.१३७ पाहा. दामले म्हणतात, "कोशामध्यें धातूंची मूळ रूपें वाच, कर, दे, जा अशी न देतां त्यांचीं 'णें'-प्रत्ययान्त रूपें देण्याची चाल आहे. म्हणजे वरील धातू कोशांत 'वाचणें', करणे, देणें, जाणें' अशा रूपानें देण्यांत येतात." दामले जेव्हा अन्य ठिकाणी 'वें-कृदन्त', 'णें-कृदन्त' म्हणतात तेव्हा त्याचा अर्थ 'वे-प्रत्ययान्त कृदन्त', 'णे-प्रत्ययान्त कृदन्त' असा आहे. 'घेणे, देणे, 'बोलणे' ही, कोशकाराच्या वरील विधानात म्हटल्याप्रमाणे क्रियापदे नसून ती 'णे-प्रत्ययान्त कृदन्ते' होत. अशा काही कृदन्तांचा भाषेत नामासारखा वापर होतो. (जसे - तुझे बोलणे मला आवडत नाही.)

कोशकाराचे वरील विधान पुढीलप्रमाणे दुरुस्त करता येईल - "धातूंना 'णे'

प्रत्यय लागून होणारी णे-प्रत्ययान्त कृदन्ते (किंवा णे - कृदन्ते) ही केव्हा केव्हा नामासारखी भाषेत योजतात."

**४)** बाराखडीचे स्पष्टीकरण करताना कोशकाराने असे विधान केले आहे (३४) - " 'कु, कू' नंतर 'कृ, क्लृ', 'गु, गू नंतर 'गृ, ग्लृ', 'पु, पू' नंतर 'पृ, प्लृ' हा क्रम शालेय शिक्षणात आणि त्यानंतर महाविद्यालयीन शिक्षणातही आपल्याला समजत नाही." या संदर्भात असे म्हणता येईल, की ऋकारयुक्त व्यंजनांचा बाराखडीत समावेश करता येईल. (मराठीत सर्वच व्यंजने ऋकारयुक्त नाहीत. उदा. च्, छ्, ज्, झ्, ण्, ल्, ळ् इ.) पण लृकार असलेला 'क्लृप्ती' हा एकमेव शब्द वगळल्यास एकही लृकारयुक्त शब्द मराठीत नाही. त्यामुळे प्रत्येक व्यंजन लृकारयुक्त दाखवणे मुळीच आवश्यक नाही. 'क्लृप्ती' हा एकच शब्द दाखवावा. अनेक भाषातज्ज्ञांच्या म्हणण्याप्रमाणे 'लृ' हा स्वर मराठीत नाही, 'क्लृप्ती' या शब्दाच्या लेखनात तो आढळतो. त्याचा उच्चार मराठी माणूस 'क्लुप्ती' असा करतो. म्हणून त्या शब्दापुढे कंसात त्याचा मराठीत रूढ असलेला उच्चार द्यावा. कोशात तो शब्द जेथे नोंदवला असेल तेथे अशी सूचना द्यावी. शालेय शिक्षणात वरच्या वर्गातील विद्यार्थ्यांना या शब्दाचा उच्चार व लेखन यांचा परिचय करून द्यावा. क्लृ, प्लृ, इ. बाराखडीत समाविष्ट करू नयेत असे सुचवावेसे वाटते.

**५)** नियम ८ मध्ये भर घालताना (४२) "पुल्लिंगी शब्दाच्या शेवटी 'जा' आल्यास उभयवचनी सामान्यरूपात तो तसाच राहतो. (त्याचा 'ज्या' होत नाही)", असे विधान केले आहे. मो.रा. वाळंबे यांनी 'मराठी शुद्धलेखन प्रदीप' या पुस्तकात (३७) 'जा' हे अंत्याक्षर असलेल्या पुल्लिंगी नामांचा विचार केला आहे. त्यांनी वरील विधानाच्या (खरे तर, हे विधान प्रस्तुत पुस्तकात वाळंबे यांनीच केलेले आहे.) स्पष्टीकरणार्थ असे म्हटले आहे - "कारण 'ज' या तालव्य उच्चारात 'य' हा तालव्य उच्चार मिळवताना एक तालव्य उच्चार नाहीसा होतो" (३७) मो. रा. वाळंबे यांनी हे विधान तालव्य 'ज'च्या संदर्भात केले आहे. मराठीत काही पुल्लिंगी 'जा'कारान्त शब्दांत दंतमूलीय 'ज' आहे (जर मधील जचा उच्चार). अशा शब्दांना तालव्य 'जा'कारान्त (जग मधील जचा उच्चार) शब्दांसंबंधीचा नियम लावता येणार नाही. त्यामुळे 'मोजा', 'सांजा' या शब्दांचे सामान्यरूप लेखनात 'मोज्यात', 'सांज्याची' असेच होईल. हाच नियम पुल्लिंगी नामात अंत्याक्षर दंतमूलीय 'चा' किंवा 'झा' असल्यास त्यांनाही लागू होतो. जसे

भाचा (दंतमूलीय च) - भाच्याने, माझा (दंतमूलीय झ) माझ्यामुळे. श्री. फडके यांनी दिलेले 'मोजा' हे उदाहरण (४२) दंतमूलीय 'ज' चे आहे. त्याचे सामान्य रूप 'ज्या' असे होईल. अंत्य 'जा' तालव्य असेल तर सामान्यरूप तेच राहील. जसे - दर्जा - दर्जाचा, बाजा - बाजाची (पेटी)

**६)** महामंडळाने नियम ८ मध्ये उदाहरणे देताना 'जीव' (प्राण या अर्थी) या शब्दाचे सामान्यरूप जिवाला असे दिले आहे. 'जि' ऱ्हस्व होईल. अपवाद देताना 'जीव' - (प्राणी या अर्थी) सामान्यरूप जीवास असे दिले आहे. 'जी' दीर्घच राहील. वाक्यात या शब्दांचा उपयोग असा होईल. १) त्याने जिवाला घोर लावला. २) वन्य जीवांची हत्या करू नये.

श्री. फडके यांनी महामंडळाने दिलेल्या उदाहरणांचा का स्वीकार केला नाही, हे कळले नाही. ती उदाहरणे नाकारण्यामागील कोशकाराची भूमिका कोठेही स्पष्ट झालेली नाही, कोशकाराने जीव (पु.) सारू. जिवा - असा. जिवां (१८०) एवढेच दाखवले आहे. प्रस्तुत कोशात जिवा, जीवा ही दोन्ही ऱ्हस्व व दीर्घ सामान्यरूपे कंसात अर्थ देऊन दाखवायला हवी होती.

**७)** मांडणीची इतर अंगे' या सदरातील (८) स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे दिले आहे. "मुख्य शब्द व त्याचे अनेकवचन ही दोन्ही रूपे एकच असतील तेव्हा अनेकवचन दाखवले नाही." कोशातील या सूचनेमुळे व अशा शब्दांची कोशात नोंद केल्यामुळे सामान्य वाचकाचा असा गैरसमज होण्याची शक्यता आहे, की अशा शब्दांचे अनेकवचन होत नाही. माझा शिक्षणक्षेत्रातील अनुभव असा आहे, की महाविद्यालयीन किंवा एम.ए., एम.फिल.चे विद्यार्थी 'दगड, देव' इत्यादी शब्दांचे 'अनेकवचन होत नाही' असे म्हणतात. कोशकर्त्यास माझी सूचना अशी, की देव, हात, दगड, कळस इ. अकारान्त पुल्लिंगी नामांपुढे (पु.) म्हणजे 'पुल्लिंगी एकवचनी नाम' अशी नोंद केलेली आहेच, पण पुढील आवृत्तीत त्यापुढे (पु.अने.) असेही नोंदवावे. असे केल्यास त्या शब्दाचे अनेकवचन होते, पण त्या शब्दाच्या रूपात बदल होत नाही, हे अधिक स्पष्ट होईल. शिवाय, ज्या पुल्लिंगी अकारान्त नामांचे अनेकवचन होतच नाही, त्या नामांपेक्षा वर दर्शविलेली नामे वेगळी आहेत हे कोश पाहणाऱ्याच्या चटकन लक्षात येईल. उदाहरणार्थ - थरकाप (पु.) व दगड (पु.) या दोन शब्दांपुढे पु. (म्हणजे पुल्लिंगी एकवचनी नाम) अशी सारखीच नोंद आहे. पण दोन शब्दांमध्ये फरक असा आहे की, दगडचे अनेकवचन होते पण रूपात फरक होत नाही, उलट, 'थरकाप' या अकारान्त

पुल्लिंगी नामाचे अनेकवचन होतच नाही, हा शब्द भाषेत सर्वत्र एकवचनीच योजला जातो. या दोन प्रकाराच्या शब्दांतील फरक लक्षात यावा म्हणून त्यांची नोंद पुढीलप्रमाणे केल्यास अधिक सोईस्कर होईल.

दगड (पु.) दगड (पु.अने.) थरकाप (पु.), किंवा भडिमार (पु.)

८) द्रव्य या शब्दाच्या संदर्भात केलेली नोंद (८) अशी आहे -

द्रव्य (न) [धन, घटक] सारू. द्रव्या [घटक] अने. द्रव्ये असा. द्रव्यां

अशीच नोंद तो शब्द शब्दकोशात योग्य त्या ठिकाणी (२३१) दाखवतानाही कोशकाराने केलेली आहे. 'द्रव्या' हे सामान्यरूप धन या अर्थी 'द्रव्य' या शब्दाचे आहे. या शब्दाचे अनेकवचन होत नाही. पुढील 'द्रव्यां' - हे सामान्यरूप 'घटक' या अर्थी 'द्रव्य' शब्द योजला जातो त्याचे आहे. हे दोन वेगळे शब्द आहेत. हे स्पष्ट होण्यासाठी द्रव्य (न) [धन] एवढाच अर्थ द्यावा व सामान्यरूप द्रव्या - दाखवावे. त्यामुळे धन या अर्थी द्रव्य शब्दाचे अनेकवचन होत नाही हे स्पष्ट होईल. त्यानंतर द्रव्य (न) [घटक] असा वेगळा शब्द देऊन त्याचे सामान्यरूप, अनेकवचन, अनेकवचनाचे सामान्यरूप द्यावे. असे केल्यास कोश पाहणाऱ्याच्या दृष्टीने ते अधिक उपयुक्त होईल.

९) मांडणीची अनेक अंगे या सदरात (१०) शेवटच्या परिच्छेदात "उपसर्गांच्या बाबतीत संयोगचिन्ह शेवटी दाखवले आहे. याचा अर्थ असा की, पुढील शब्द या शब्दांना जोडून लिहायचा आहे." असे विधान आहे. 'सु' व 'बिन' या उपसर्गांच्या नंतर - हे चिन्ह दाखवायला हवे होते. ते उपसर्गाच्या आधी दाखवले गेले आहे. हा मुद्रणदोष आहे. पुढील आवृत्ती बिन - (उपसर्ग) सु - (उपसर्ग) ही दुरुस्ती अवश्य करावी. दुसरे, हे उपसर्ग आहेत, कोशकाराने त्यांना 'शब्द' म्हटले आहे. त्यांना शब्द म्हणता येणार नाही.

१०) विभक्ती प्रत्ययांवरून मानाव्यात की अर्थावरून, या वादात शिरण्याचे प्रस्तुत कोशाचे प्रयोजन नसल्यामुळे प्रत्येक पृष्ठाच्या शेवटी तळाशी दिलेल्या सूचनांमध्ये विभक्तिप्रत्यय देताना ० (शून्य प्रत्यय) अशी नोंद करण्याची आवश्यकता नाही. त्याचप्रमाणे स, ला या प्रत्ययांची पुनरुक्तीही टाळता येईल.

११) कोशात बालिशता, भयाणता, मृदुता, मोहकता, रूढिप्रियता, यशस्विता, वारंवारता इ. भाववाचक नामांच्या अनेकवचनी रूपांची सामान्यरूपे दिली आहेत. अशा भाववाचक नामांची अनेकवचने संभवत नाहीत. जसे, रुक्षता या भाववाचक नामाचे अनेकवघन होत नाही, कोशकारानेही ते दिले नाही. सामान्यतः 'ता'

प्रत्ययान्त भाववाचक नामांची अनेकवचनी रूपे होत नाहीत, तरी कोशात का दिली?

**१२)** धर्मांची, रागांची नावे ही नामांप्रमाणे विशेषणेही आहेत - बौद्ध, जैन, जोगिया (पु.) व (वि.) दोन्ही आहेत. पण कोशात जोगिया फक्त (वि.) दिले आहे. तसेच ज्यू (पु.वि.) दिले आहे. पण या नामाचे अनेकवचनी सामान्यरूप दिले नाही. ज्यूं - असे द्यावयास हवे.

**१३)** 'गिरिजा' 'अनुराधा' इ. शब्दांचे सामान्यरूप 'गिरिजे' 'अनुराधे' असे दिले आहे. ही विशेषनामे आहेत. मराठीत अलीकडे विशेषनामांचे सामान्यरूप न करण्याकडे प्रवृत्ती आहे. कोशात निदान पर्याय द्यावा. प्रस्तावनेत त्यासंबंधी स्पष्टीकरण दिल्यास अधिक चांगले होईल.

**१४)** एखाद्या शब्दाचे चुकीचे लेखन रूढ असेल तर कोशकाराने ते स्वीकारले आहे, हे कोशकाराचे धोरण योग्य वाटते. 'मातोश्री', 'वर्तुळ' सारख्या दोन, तीनच शब्दांची 'चूक पण रूढ शब्द' असा शेरा मारून कोशकाराने नोंद केली आहे. आणखीही चार पाच शब्दांची भर घालता येईल. उदाहरणार्थ - पूर्वापार✗ पूर्वापर✓ पूर्वापार - चूक पण रूढ शब्द.

मध्यंतर (न) असा शब्द कोशात दिला आहे. खरे पाहता तो शब्द मध्यांतर असा आहे. कोशात तो पुढीलप्रमाणे द्यावा. मध्यांतर(न✓) मध्यंतर (न✗) चूक पण रूढ शब्द.

चतुर्मास असा शब्द कोशात आहे. चातुर्मास✗ अशी खूण करून नाकारला आहे. मराठीत जवळजवळ सर्वत्रच 'चातुर्मास' हाच शब्द रूढ आहे. ('कालनिर्णया'तही चातुर्मास शब्द वापरलेला आढळतो.) या शब्दाची नोंद पुढीलप्रमाणे करावी -

चतुर्मास✓ - चातुर्मास✗ - चूक पण रूढ शब्द.

तसेच निद्रित✓ निद्रिस्त✗ - चूक पण रूढ शब्द.

**१५)** वारंवार होणाऱ्या चुकांत पुढील शब्दांची भर घालता येईल.

| | | | |
|---|---|---|---|
| दत्तात्रेय✓ | दत्तात्रय✗ | मयूर✓ | मयुर✗ |
| त्र्यंबक✓ | त्रिंबक✗ | धूम्रपान✓ | धुम्रपान✗ |
| मूल्यवान✓ | मौल्यवान✗ | | |

**१६)** हिंदीतील काही शब्द कोशात दिले आहेत. त्याऐवजी मराठी शब्द द्यायला हवे होते. उदा., प्रेमिका - मराठीत प्रेयसी, प्रिया हे शब्द आहेत. निर्दयी - मराठीत

निर्दय हे विशेषण आहे, तेच द्यावे. निर्दयी देऊ नये.

**१७)** संदर्भ-ग्रंथ सूचीमध्ये एक मोठी चूक झाली आहे. 'शास्त्रीय मराठी व्याकरण' याचे लेखक कृ.श्री. अर्जुनवाडकर असे दिले आहे. प्रस्तुत ग्रंथाचे लेखक मोरो केशव दामले आहेत. हा ग्रंथ कृ.श्री. अर्जुनवाडकरांनी संपादित केला आहे. (सन १९७०).

**१८)** प्रस्तुत 'लेखनकोश' ज्याप्रमाणे औपचारिक, ग्रांथिक लेखनासाठी उपयुक्त आहे, तसाच तो अनौपचारिक, ललित लेखनासाठीही उपयुक्त होण्याच्या दृष्टीने या कोशात भर घालता येईल. (महामंडळाच्या नियम १३ मध्ये त्याला मान्यता दिली आहे.) ललित वाङ्मयात आपण बोलताना जसे एकारान्ताऐवजी आघातयुक्त दीर्घ अ उच्चारतो, (केले ऐवजी केलं) तो उच्चार लेखनात दर्शवण्यासाठी मराठीत त्या अन्त्य अकारयुक्त अक्षरावर शीर्षाबिंदू देण्याची पद्धत आहे. 'कसे काय? बरे आहे?' हे वाक्य बोलभाषेत 'कसं काय? बरं आहे?' असे उच्चारले जाते. पुष्कळदा लेखक, विद्यार्थी (महाविद्यालयातील, विद्यापीठातीलही) 'कस काय? बर आहे?' असे लिहिताना दिसून येतात. प्रस्तुत कोशात बोलभाषेतील अशा रूपांची नोंद करता आली तर कोशाची उपयुक्तता अधिक वाढेल. उदा., कणीस (न) अनेकवचन कणसे (कणसं) किंवा कणसे - (सं), लिंबू (न) अने. लिंबे (लिंबं) किंवा लिंबे (बं) अशी रूपे देता येतील. ललित लेखन करणाऱ्यास अशा नोंदींचा निश्चितच उपयोग होऊ शकेल. 'कोश कसा पाहावा?' या प्रास्ताविकात या नोंदीचे स्पष्टीकरण देता येईल.

प्रस्तुत लेखनकोशातील शब्दांच्या अकारविल्हे नोंदी पृ. ४७ पासून सुरू होतात. काही शब्दांच्या रूपांबद्दल, व्याकरणातील जातींबद्दल काही शंका व चुका नोंदवीत आहे. स्थलाभावी सर्वच शंकांची व चुकांची नोंद करणे शक्य नाही. महत्त्वाच्या शंका देत आहे; काही ठिकाणी 'भर घालावी' असे सुचवले आहे. शब्दांची पुनरावृत्ती काही ठिकाणी झाली आहे. तर काही मुद्रणदोष आढळतात. दुसरी आवृत्ती निर्दोष होण्यासाठी ती प्रसिद्ध करण्यापूर्वी या सर्वांचा कोशकाराने जरूर विचार करावा. (येथे ज्या शब्दांचा उल्लेख आहे त्या शब्दांचे पृष्ठांक मी दिलेले नाहीत. कोशातून ते शब्द शोधणे सहज शक्य आहे.)

कोशात खडावा (स्त्री) [एकवचनी नाम] अशी नोंद आहे. खडाव (स्त्री) एकवचन असून खडावा हे स्त्री. अनेकवचन आहे.

मनुका (स्त्री) दिले आहे. हे एकवचनी नाम नसून मनुका (स्त्री) हे

अनेकवचन होय. एकवचन 'मनुक' (स्त्री) फारसे रूढ नाही.

येरझारा (स्त्री) [एकवचनी नाम] असे नोंदवले आहे. येरझार (स्त्री) एकवचन असून येरझारा हे अनेकवचन आहे.

दुः - (प्रत्यय) (पृ. २२५) म्हटले आहे. तो प्रत्यय नसून उपसर्ग आहे. याचबरोबर दु हा उपसर्गही द्यावा.

जमुनिया (न.) अशी नोंद केली आहे. हा शब्द कोशात आढळत नाही. शिवाय, मराठीत एकही आकारान्त नपुसकलिंगी नाम नाही.

आरडाओरडा (स्त्री) नाम म्हणून नोंदवले आहे. हा शब्द पुल्लिंगी एकवचनी नाम आहे. कोशकाराने त्याचे अनेकवचन आरडेओरडे दिले आहे. या अनेकवचनी रूपावरूनच हा शब्द पुल्लिंगी आहे हे सिद्ध होते. (जसे, घोडा - घोडे) हा शब्द स्त्री. असता तर त्याचे अनेकवचन आरडाओरडी-ड्या असे काहीसे झाले असते.

अळीमिळी गुपचिळी या शब्दाची जात के.अ. (केवलप्रयोगी अव्यय) अशी दिली आहे. हे उद्गारवाचक नव्हे. हा काही भावनोद्गार नाही. ही बालभाषेतील संज्ञा (खरे म्हणजे आज्ञाच) आहे. हे स्त्री. नाम फार तर म्हणता येईल.

आळीपाळी (स्त्री) या शब्दाचे आळयापाळया असे अनेकवचन दिले आहे. मराठीत 'आळीपाळी' असा शब्द वापरात नाही. 'आळीपाळीने' हाच शब्द प्रचलित आहे. हे नाम नसून 'आळीपाळीने' हे क्रि.वि. आहे.

उमलती (वि.) दिले आहे. हे विशेषण ई-कारान्त आहे का? विशेषण म्हणून नोंदवताना संकेताप्रमाणे पुल्लिंगी रूप उमलता द्यावे व नंतर त्याची स्त्री., न., सामान्यरूप इ. द्यावे.

उश्वास - असा शब्द नसून उच्छ्वास (उच्छ्‌वास) असा आहे. हा बहुधा मुद्रणदोष असावा.

कःपदार्थ - (के.अ.) दिले आहे. हे विशेषण किंवा क्रि.अ. आहे. (उदा. तो आपल्या नोकराला कःपदार्थ समजतो. क्रि.अ.)

गयावया (स्त्री) (एकवचनी नाम) याचे सामान्यरूप 'गयेवये' दिले आहे. ते ऐकिवात नाही.

गुरे (न.अने.) दिले आहे. या शब्दाचे एकवचन 'गुरू' (जनावर) भाषेत आहे. ते कोशात या शब्दाच्या आधी दिलेच आहे. पुनः देण्याची आवश्यकता वाटत नाही.

चर्र (न) या शब्दाचे सामान्यरूप 'चर्रा' दिले आहे. ते प्रचारात नाही.

छी थू (स्त्री) दिले आहे. हे मुळात केवलप्रयोगी अव्यय (उद्गारवाचक) असून ते नामाप्रमाणे वापरता येते. (जसे, त्याची सर्वत्र छी थू झाली.)

जर - हे उभयान्वयी अव्ययही आहे. (जर - तर). कोशात देणे आवश्यक आहे.

झुंजूमुंजू (न) याचे सामान्यरूप 'झुंजूमुंजा' हे प्रचारात नाही ते कोशात देऊ नये.

ठिय्या देणे, पिच्छा पुरवणे, थांग लागणे / न लागणे, सुंबाल्या करणे इ. वाक्प्रचार आहेत. अशा वाक्प्रचारांतील ठिय्या, पिच्छा, थांग, सुंबाल्या इ. शब्दांची अनेकवचनी किंवा एकवचनी सामान्यरूपे होत नाहीत. ठिय्यांचे ठिय्ये, पिच्छा चे पिच्छे, सुंबाल्या चे सुबाल्ये किंवा थांग चे सामान्यरूप थांगा इ. कोशात दिले आहेत. अशी रूपे मराठीत आढळत नाही. तसेच दुमत या शब्दाचे अनेकवचन दुमते ऐकिवात नाही.

दुरकी (के.अ.) हा उद्गार आहे, असे वाटत नाही.

धिंडवडा या शब्दाचे अनेकवचन धिंडवडे हेच रूढ आहे. अलीकडे तरी हे एकवचन भाषेत वापरात नाही. हा शब्द कोशात धिंडवडे (पु.अने.) असा देणे योग्य होईल.

पुनर्मीलन - हा शब्द 'पुनर्मिलन' असा आहे. फार तर पुनर्मीलन चूक पण रूढ शब्द अशी नोंद करता येईल.

मंडळी (स्त्री) (समुदाय) ही नोंद योग्यच, पण मंडळी (पु.) (नायक) अशी नोंद केली आहे. ती ऐकिवात नाही.

रंध्र (पु.) दिले आहे. म्हणजे हा शब्द अकारान्त पुल्लिंगी एकवचनी आहे असे कोशकाराला म्हणायचे आहे. हा शब्द जर पुल्लिंगी असता तर त्याचे अनेकवचन रंध्र असेच (म्हणजे रूपात बदल न झालेले) राहिले असते. (जसे, देव ए.व.-देव अने.) कोशकाराने 'रंध्र'चे अनेकवचन रंध्रे दिले आहे. हे अनेकवचन 'रंध्र' हा शब्द नपुसकलिंगी असेल तरच होईल. रंध्र हा शब्द न. आहे. पु. नव्हे.

वाहवा मुळात केवलप्रयोगी अव्यय आहे. जेव्हा ते नामाप्रमाणे भाषेत वापरतात तेव्हा त्याचे सामान्यरूप होत नाही. 'छी थू' प्रमाणेच 'वाहवा' ही तसेच राहील. 'वाहवे' असे सामान्यरूप होणार नाही.

हरामाचा असा शब्द कोशात आढळतो. 'हराम' शब्दाचे हे षष्ठयन्त रूप आहे. नामाची अशी षष्ठयन्त रूपे कोशात देण्याची आवश्यकता वाटत नाही.

(हरामाचा पैसा प्रमाणे मूर्खांचा बाजार, रोगाचा प्रादुर्भाव अशी अनेक षष्ठ्यन्त रूपे द्यावी लागतील. 'चा' हा षष्ठी विभक्तीचा प्रत्यय कोशकाराने स्वीकारलेला आहे.)

आढावेढा - असा शब्द दिला आहे. या शब्दाचे अनेकवचनी रूपच भाषेत योजतात. 'आढेवेढे घेणे' असेच भाषेत प्रचारात आहे. श्रम, परिश्रम, आढेवेढे, धिंडवडे इत्यादी शब्द आजच्या मराठीत अनेकवचनीच रूढ आहेत.

लाली (स्त्री) या नामाचे अनेकवचन 'लाल्या' कोशात दिले आहे, ते प्रचारात नाही.

लोणी, दही यांची अनेकवचने लोण्ये, दह्ये अशी कोशात दिली आहेत. दामले यांनी शास्त्रीय मराठी व्याकरणात अशी रूपे दिली आहेत, पण आधुनिक मराठीत 'लोणी' 'दही' 'पाणी' 'ताक' यांची अनेकवचने ऐकिवात नाहीत. (कोशकाराने प्रस्तावनेत या संदर्भात स्पष्टीकरण देणे आवश्यक वाटते.

हवा - हिरिरी चे अनेकवचन संभवत नाही. हवां, (असा) हिरिऱ्या असे कोशात दिले आहे.

सिंदूर शब्दाचे सामान्यरूप सिंदूरा - दिले आहे. ते 'सिंदुरा' - असे (ऱ्हस्व 'दु') हवे.

मराठीत रूढ झालेल्या इंग्रजी शब्दांचे लिंग - कोशात पेन (न) - दिला आहे. हा शब्द मराठीत तिन्ही लिंगी प्रचारात आहे. (जसे - तो पेन, ते पेन, ती पेन)

लिफ्ट (स्त्री) दिला आहे. - हा शब्द पुल्लिंगीही योजतात.

कोशात काही शब्दांच्या संदर्भात भर घालता येईल.

अंतःस्थ - नाम दिले आहे. ते विशेषण आहे. जसे (अंतःस्थ हेतू)

अंध (वि.) दिले आहे. नामाप्रमाणेही योजता येते. (अंधांसाठी संस्था)

अभावी (वि.) दिले आहे. अभावी हे शब्दयोगीही आहे. (पैशाअभावी)

आड (पु.) नाम दिले आहे. शब्दयोगी अव्ययही आहे. (एक दिवसाआड)

आयुष्य (न) नाम दिले आहे. अनेकवचन दिले नाही पण अनेकवचन होऊ शकेल (त्याने अनेकांची आयुष्ये बरबाद केली.)

अनुग्रह या पुल्लिंगी नामाचे अनेकवचन दिले नाही. ते रूढ आहे. (वरिष्ठांनी केलेल्या अनेक अनुग्रहांनी .....) अनेकवचनी सामान्यरूप अनुग्रहां द्यावे.

उपभोग - अनेकवचन द्यायला हवे. (त्याने अनेक उपभोग घेतले.) अनेकवचनी सामान्यरूप उपभोगां - द्यावे.

उलट (क्रि.वि., व श.अ.) दिले आहे. ते विशेषणही आहे. (उलट उत्तर देऊ नकोस, उलट तपासणी.)

कडे (न.) नाम दिले आहे; ते शब्दयोगी अव्ययही आहे. (घराकडे, आईकडे जा.)

घोर - (पु.) नाम दिले आहे. विशेषणही आहे. (घोर निराशा, घोर अपराध, घोर अरण्य)

खचित विशेषण दिले आहे. क्रियाविशेषण अव्ययही आहे. (तो उद्या खचित येईल.)

खातर (खात्री या अर्थी) स्त्री. नाम दिले आहे. ते शब्दयोगी अव्ययही आहे. (प्रेमाखातर, मैत्रीखातर)

धर्मनिष्ठ, नास्तिक, बंडखोर, भामटा, रणशूर इ. विशेषणे नामांप्रमाणे भाषेत योजली जातात. (धर्मनिष्ठांची सभा, नास्तिकाचे मत इ.)

पुढील (वि.) दिले आहे. शब्दयोगी अव्ययही आहे (त्यापुढील, शाळेपुढील)

मूत्रपिंड (न) नामाचे अनेकवचन 'मूत्रपिंडे' दिले नाही. देणे आवश्यक.

मूर्तिमंत (क्रि.अ.) दिले आहे. विशेषणही आहे (कर्ण म्हणजे मूर्तिमंत औदार्य.)

मृतप्राय (क्रि.अ.) दिले आहे. तसेच ते विशेषणही आहे (मृतप्राय रूढी)

रिक्षा (स्त्री) दिले आहे. पुल्लिंगी रूपही प्रचारात आहे.

वळीवचे सामान्यरूप वळिवा - दिले आहे. त्याला पर्याय - वळवा द्यावा.

विस्थापित - (वि) दिले आहे. नामाप्रमाणे उपयोगात येते. (विस्थापितांचे प्रश्न)

शीत (न.) दिले आहे. त्याप्रमाणे ते विशेषणही आहे. (शीत प्रदेश, शीत पेय) कोशात नोंद करावी.

सारखा - (वि., क्रि.वि.) दिले आहे. शब्दयोगी अव्ययही आहे. (तो अगदी भावासारखा दिसतो.)

सारस्वत (पु.) दिले आहे. पण वाङ्मय या अर्थी नपुसकलिंगी आहे.

सालिना (क्रि.अ.) दिले आहे. विशेषणही आहे. (सालिना उत्पन्न) या शब्दातील 'लि' दीर्घही (ली) लिहितात.

स्वातंत्र्यवीर (पु.) नाम दिले आहे. तसेच ते विशेषणही आहे. (स्वातंत्र्यवीर सावरकर)

## गट २ क्रियापदे

कोशकाराने क्रियापदांचा स्वतंत्र विभाग केला आहे 'क्रियापदांची रूपे पाहण्यापूर्वी' ...' या प्रास्ताविकात तसे करण्यामागील हेतू स्पष्ट केला आहे.

या प्रास्ताविकातील विवेचन सर्वसामान्य वाचकाला अनाकलनीय झाले आहे. सामान्य वाचकांसाठी व्याकरणातील संज्ञा कमीत कमी वापरून हे विवेचन अधिक सोपे करता आले असते. सामान्य वाचकांच्या दृष्टीने ते समजून घेण्यापेक्षा क्रियापदांकडे थेट वळणे अधिक सोईचे ठरेल. दामले आदी वैयाकरणांनी प्रत्ययांची जी वर्गवारी केली आहे, ती जर कोशकाराने स्वीकारली असती तर विवेचन सोपे झाले असते. वर्तमान, भूत, अपूर्ण वर्तमान, पूर्ण भूत इ. न स्वीकारता 'आख्याते' ही संकल्पना स्वीकारायला हवी होती. (ताख्यात, लाख्यात, वाख्यात इ.)

कोशकाराने धातूंची रूपे 'णे' प्रत्ययान्त दिली आहेत. कंसात धातूची मूळ रूपे व त्यापुढे आख्यात प्रत्यय लागण्यापूर्वी होणारी क्रियापदाची रूपे व द्वितीय पुरुषी एकवचनी आज्ञार्थाची रूपे दिली आहेत.

धातूंची यादी वाचताना हे जाणवले, की यातील काही धातू मराठीत वापरात नाहीत. उदा. आदरणे, आरोपणे, कैवारणे, निढळणे, परिकरणे, पालथणे, लकबणे, शंकणे, शोकणे इ.

उन्मादणे - असे धातूचे रूप रूढ नसून 'उन्माद होणे / येणे, असे रूप प्रचारात आहे. कांगावणे ऐवजी कांगावा करणे, क्रोधणे ऐवजी क्रोध येणे, खंडणे ऐवजी खंडन करणे, द्वेषणे ऐवजी द्वेष करणे, तृषणे - ऐवजी तृषा लागणे, भलावणे ऐवजी भलावण करणे, लोभणे ऐवजी लुब्ध होणे (लोभ उत्पन्न होणे) अशा पद्धतीने ती भाषेत योजली जातात.

प्रस्तुत कोशात 'करूया' (४७०) जोडून लिहिलेले आढळते. अशी रूपे इतरही अनेक ठिकाणी दिसतात. 'करूया' हा शब्द तोडून लिहायला हवा - 'करू या'. हे संयुक्त क्रियापद आहे. 'करू' हे मुख्य धातूचे कृदन्त असून 'या' हे सहाय क्रियापद आहे.

कोशात काही ठिकाणी शब्दांची पुनरुक्ती झाली आहे व काही शब्द चुकीचे छापले गेले आहेत. हे मुद्रणदोष पुढील आवृत्तीत काढून टाकता येतील. वानगीदाखल दोन-तीन उदाहरणे देत आहे.

चढा (१५४) वर दिला आहे. (१५५) वर त्या शब्दाची पुनरुक्ती झाली आहे.





अनुक्रमणिका

चेहरा, चेहरामोहरा इ. शब्द (१६५) वर दिले आहेत. (१६६) वर त्यांची पुनरुक्ती झाली आहे.

झकपक - (१८५) वर या शब्दाची पुनरुक्ती झाली आहे.

**काही मुद्रणदोष**

(१३) स्पेलिंग डिक्शनरि व पुढे स्पेलिंग डिक्शनरी.

(२७) प्रुढील शब्द 'पु' हवे.

(९) रितीने (री)

(१८) जयेंद्र साळगांवकर (गा)

(३४५) मोक्षाथी (र्थी)

(३४१) मूद (स्त्री) - शब्दाची इतर रूपे छापताना चूक झाली आहे.

(१०) "-बिन", "-सु" असे छापले गेले आहे. चिन्ह (-) बिन, सु यांच्यानंतर हवे. (बिन -, सु -)

(३८) स्रादी - स्वरादी हवे.

माझ्या ह्या परीक्षणात या संग्राह्य कोशाची गुणवत्ता मी जाणली आहे. दोष दाखवले आहेत. याचे कारण हा अत्यंत मोलाचा कोश निर्दोष व्हावा, हे आहे. 'दोषदिग्दर्शन म्हणजे ग्रंथाची योग्यता जाणणे' असे एका विद्वानाचे वचन आहे. ■

२/४ विसावा हाइट्स, डी.पी. रोड, औंध, पुणे - ४११ ००७.

आपल्या अजाण मित्राला एकाने शेक्सपियरचं 'हॅम्लेट' नाटक पहायला आग्रहपूर्वक नेलं. 'कसं काय वाटलं नाटक?', त्यानं नाटक संपल्यावर मित्राला उत्सुकतेनं विचारलं, 'हा कोण लेखक आहे त्याला स्वतंत्र बुद्धी नसावी, नाटक खचाखच अवतरणांनी भरलेलं आहे!'

लंडनला 'ओथेलो' नाटकाचा प्रयोग रंगलेला होता. ओथेलोचा संशय क्रमाक्रमाने बळावला होता. त्याच वेळी नेमका पिटातला एक प्रेक्षक संतापून ओरडला, 'मूर्खा, दिसत नाही का तुला डेज्डिमोना निष्पाप आहे ते?'

काही घडत नाही, कुणी येत नाही, कुणी जात नाही, म्हणजे वैतागच!
सॅम्युएल बेकेट, 'वेटिंक फॉर गॉडो' (नाटकातलं बोलणं नाटकालाच लागू पडेलसं)



अनुक्रमणिका

## १) पाचव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त

मराठी अभ्यास परिषदेची पाचवी वार्षिक सर्वसाधारण सभा दि.२९ जुलै, २००१ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या ग्रंथालयात ठीक ६ वाजता सुरू झाली. कार्यवाह नीलिमा गुंडी यांनी उपस्थितांचे स्वागत केले आणि अंजली सोमण यांना सभेचे अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केली. (मराठी अभ्यास परिषदेचे अध्यक्ष डॉ. अशोक केळकर प्रकृती अस्वास्थ्यामुळे सभेस उपस्थित राहू शकले नाहीत.) सुरुवातीला कार्यवाहांनी एका ठरावाद्वारे प्रा. मे. पुं. रेगे आणि मोहन वेल्हाळ यांना श्रद्धांजली वाहिली. तेव्हा सर्व सभासदांनी एक मिनिट स्तब्ध उभे राहून आपल्या भावना व्यक्त केल्या.

त्यानंतर कार्यवाहांनी चौथ्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त वाचून दाखवले. त्याला कल्याण काळे यांनी सूचक व विठ्ठल सोनवणे यांनी अनुमोदक म्हणून मान्यता दिल्यावर सभेने ते मान्य केले. सभेत बहुमताने मान्य होणाऱ्या ठरावांना आपली मान्यता कळवणारे सु. रा. चुनेकरांचे पत्रही कार्यवाहांनी वाचून दाखवले.

परिषदेच्या २००० - २००१ या वर्षाचे कार्यवृत्त कार्यवाहांनी सविस्तरपणे सादर केले. दि. १८ जाने., २००१ रोजी संस्थेच्या कार्यकारिणीच्या बैठकीत झालेल्या ठरावानुसार नीलिमा गुंडी यांची कार्यवाह म्हणून नियुक्त झाली. जाने. २००१ मध्ये विजया देव यांनी वैयक्तिक कारणासाठी 'भाषा आणि जीवन' (त्रै.) या परिषदेच्या पत्रिकेच्या संपादकपदाचा राजीनामा दिला. त्यामुळे मृणालिनी शहा यांची संपादकपदी नेमणूक करण्यात आली. या बदलांची सभागृहाला माहिती दिल्यानंतर कार्यवाहांनी, पूर्वीच्या कार्यवाह शहा यांनी १० वर्षे संस्थेसाठी निरलसपणे काम केल्याबद्दल यांचे आभार मानले. संस्थेची रीतसर नोंदणी होण्यासाठी आवश्यक त्या तांत्रिक बाबींची परिपूर्तता शहा यांच्या कारकिर्दीत झाली, याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेखही केला गेला. विजया देव यांनी ३ वर्षे 'भाषा आणि जीवन'च्या संपादक पदाची धुरा बाळगल्याबद्दल त्यांचेही कार्यवाहांनी आभार मानले. याशिवाय संस्थेचे अन्य उपक्रम उदा. महाबँक पुरस्कार, 'अंतर्नाद' मधील 'संसार भाषेचा' हे सदर, पुणे विद्यापीठाच्या सहकार्याने १९९९ मध्ये घेतलेल्या चर्चासत्रावर आधारित 'मराठीचे भवितव्य' हे प्रकाशित झालेले पुस्तक इत्यादींची

माहिती कार्यवाहांनी दिली. एका प्रश्नाला उत्तर देताना संस्थेची सभासद संख्या - आजीव सदस्य २७९ इतकी असून कार्यकारिणीच्या वर्षभरात ५ बैठकी झाल्याची माहितीही पुरवण्यात आली. हे कार्यवृत्त डॉ. रमेश पानसे यांनी सूचक व प्रा. मनोहर राईलकर यांनी अनुमोदक म्हणून मान्य केल्यावर सभेनेही स्वीकारले. कार्यवाहांनी आपले आगामी संकल्पित उपक्रमही बोलून दाखविले. त्यात दि. ९-९-२००१ रोजी म.सा.परिषदेच्या सहकार्याने आयोजित करावयाचे चर्चासत्र आणि कुसुमाग्रज जन्मदिनी सादर करावयाचा कार्यक्रम यांचा समावेश होता.

कोषाध्यक्ष द. दि. पुंडे यांनी संस्थेच्या २०००-२००१ चा आर्थिक ताळेबंद सादर केला. त्याला विद्यागौरी टिळक यांनी सूचक व अपर्णा झा यांनी अनुमोदक म्हणून मान्यता दिल्यावर सभागृहाची मान्यता मिळाली. पुढील वर्षाचे २००१-२००२ चे अंदाजपत्रक कोषाध्यक्षांनी मांडले त्यात टपालदरामुळे त्रैमासिकाच्या वर्गणीत त्यांनी १ जानेवारी, २००२ पासून एका ठरावाद्वारे वाढ सुचविली. ती अशी : **व्यक्ती** : वार्षिक वर्गणी रु. १००/- व पंचवार्षिक वर्गणी रु. ४५०/- **संस्था** : वार्षिक वर्गणी रु. १२५/- व पंचवार्षिक वर्गणी रु. ५५०/- या ठरावावरील चर्चेत रमेश पानसे यांनी आजीव सदस्यत्व वर्गणी साधारण सभासद वर्गणीपेक्षा दहा पटीने अधिक असावी लागते; तेव्हा आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १०००/- करण्याची मागणी केली. ठरावात तसा समावेश केल्यानंतर या ठरावाला गं. ना. जोगळेकर यांची सूचक व राजशेखर शिंदे यांनी अनुमोदक म्हणून मान्यता दिल्यावर ठरावासकट अंदाजपत्रक मंजूर झाले.

लेखापरीक्षक ए. जे. दिघे आणि कंपनीला व कायदेविषयक सल्लागार म्हणून ॲड. विनय देशपांडे यांना (योग्य ते मानधन देऊन) नेमण्याविषयीच्या ठरावाला कल्याण काळे यांनी सूचक व श्रीरंग संगोराम यांनी अनुमोदक म्हणून मान्यता दिली.

शेवटी अंजली सोमण यांनी अध्यक्षीय भाषणात मराठीवर होणाऱ्या अन्य भाषांच्या आक्रमणाबाबत चिंता व्यक्त केली. तसेच मुंबई, औरंगाबाद, पुणे या शहरांसाठी परिषदेतर्फे प्रतिनिधी नेमण्याची कल्पना त्यांनी मांडली. तसेच मराठी भाषेविषयी आस्था असणाऱ्या सर्व संस्थांची सूची करून सर्वांनी मिळून एखादा उपक्रम करण्याची इच्छाही त्यांनी बोलून दाखवली.

या सभेच्या निमित्ताने आजीव सदस्यांच्या मानसिक सहभागाचे प्रत्यंतर संस्थेच्या पदाधिकाऱ्यांना आले. शेवटी कार्यवाहांनी आभार मानले. चहापानानंतर

सभेची औपचारिक सांगता झाली.

**२) चर्चासत्राचे आयोजन**

मराठी अभ्यास परिषद, मराठी साहित्य परिषद आणि श्री. के. क्षीरसागर जन्मशताब्दी समिती यांच्या संयुक्त विद्यमाने दि. ९-९-२००१ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या पटवर्धन सभागृहात एक चर्चासत्र आयोजित केले होते. डॉ. द. ना. धनागरे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या चर्चासत्रात डॉ. कल्याण काळे यांनी क्षीरसागरांच्या 'मराठी भाषा वाढ आणि बिघाड' या विषयावर निबंधवाचन केले.

■

**सूचना फलक**

## पत्रिकेबद्दल वार्षिक निवेदन

'मराठी अभ्यास परिषद पत्रिका' या नियतकालिकाची मालकी व इतर बाबी यांच्या संबंधी वृत्तपत्रे आणि पुस्तकनोंदणी अधिनियम कलम डी १९ (बी) आणि वृत्तपत्रे नोंदणी (केंद्रिय) नियमावली १९५६, नियम ८, नमुना ४, यांना अनुसरून केलेले निवेदन.

**१) प्रकाशन स्थळ :** पुणे, महाराष्ट्र

**२) प्रकाशनाची कालनियतता :** त्रैमासिक, जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर.

**३) मुद्रकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय,
पत्ता : ३, अन्नपूर्णा १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे - ४११ ००२.

**४) मुद्रणस्थळ :** पद्मरेखा आर्ट्स, १९४/२ नवी पेठ, पुणे - ४११ ०३०.

**५) प्रकाशकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** नीलिमा गुंडी, भारतीय, कार्यवाह, मराठी अभ्यास परिषद, पत्ता : कलम ३ प्रमाणे

**६) संपादकाचे नाव, राष्ट्रीयता, पत्ता :** मृणालिनी शहा, भारतीय,
पत्ता : १ शीतल अपार्टमेंट, ४६/४ एरंडवणा, पुणे - ४११ ००४.

मी नीलिमा गुंडी असे प्रतिज्ञापूर्वक सांगते की, वर दिलेला तपशील माझ्या माहिती आणि समजुतीप्रमाणे खरा आहे.

**नीलिमा गुंडी**
**प्रकाशक**










# वर्ष १९, २००१ची लेखन सूची

## लेखक सूची

## लेखसूची















मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



■




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



**१. ‘मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन’ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. १ जानेवारी, २००२ पासून वर्गणीचे दर पुढीलप्रमाणे राहतील.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| वार्षिक वर्गणी - संस्थेला | रु. १२५ फक्त | पंचवार्षिक | रु. ५५० फक्त |
| व्यक्तीला | रु. १०० फक्त | पंचवार्षिक वर्गणी | रु. ४५० फक्त |
| परदेशातील व्यक्ती / संस्था २० डॉलर | | | |

**२. आजीव वर्गणी :**

मराठी अभ्यास परिषदेची आजीव सदस्यत्व वर्गणी रु. १०००/-. पूर्वीच्या आजीव सदस्यांनी वर्गणीतील वाढीव रक्कम रु.४००/- भरावी, असे परिषदेतर्फे आवाहन आहे.

**३. पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी प्रत्यक्ष रोखीने किंवा धनादेशाने देता येईल. कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश ‘मराठी अभ्यास परिषद’ या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे. पावती दिली जाईल. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा.

वर्गणी व तत्संबंधी पत्रव्यवहाराचा पत्ता : नीलिमा गुंडी, ३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५, वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२. दू. क्र. ४४८६०१५

**३. मागील अंक :**

‘भाषा आणि जीवन’ हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुटया अंकाची किंमत रु. २०/-

**५. प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक ‘निवडक भाषा आणि जीवन’ (किंमत रु. २००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाउसमध्ये मिळू शकेल. तसेच ‘भाषांतरमीमांसा’ हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनाकडे उपलब्ध आहे.

**६. जाहिरातीसाठी दर :**

पूर्ण पान रु. ७५०/- , अर्धेपान रु. ४००/-, पाव पान रु. २५०/-, शुभेच्छा सूचना रु. १००/-, आवरण पृष्ठ तीन / चार रु. ८००/- जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

R.N.I.नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३

## आपण मराठी-अभ्यास-परिषदेसाठी काय करणार?

- सभासद नसाल, तर प्रथम स्वतः सभासद व्हा.
- सभासद असाल, तर देणगीदार आणि वार्षिक सभासद मिळवून द्या.
- परिषदेसाठी काही नियमित वेळ देऊ शकत असाल तर कार्यवाहांशी संपर्क साधा.
- परिषदेचे सर्व कार्यकर्ते आपले नित्याचे काम सांभाळून परिषदेची कामे करीत असल्यामुळे एकाच्या जागी चार कार्यकर्ते लागतात.
- परिषदेने प्रकाशित केलेल्या पुस्तकांच्या विक्रीसाठी साहाय्य करा.
- परिषदेचे काम वाढविण्यासाठी नवनव्या कल्पना सुचवा.

## आपण पत्रिकेसाठी काय करू शकता?

- लेखन पाठवा.
- परभाषांतून अनुवाद करा.
- ग्रंथपरीक्षणे लिहा.
- 'पुनर्भेट' किंवा 'वाघिणीचे दूध' या सदरास योग्य अशा मराठी किंवा अन्य भाषेतील मजुकराबद्दल सूचना पाठवा.
- भाषेसंबंधी वार्ता, भाषादोषांची उदाहरणे, चांगल्या भाषेची उदाहरणे, इत्यादींशी संबंधित वृत्तपत्रीय किंवा इतर कात्रणे पाठवा.
- पत्रिकेत भाषा व्यवहाराशी संबंधित हास्यचित्रे द्यायची कल्पना कशी वाटते?
- जाहिरात मिळवून द्या.
- संस्था-वर्गणीदार मिळवून द्या.

---


**संपर्क**

**मराठी अभ्यास परिषद**

३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर गल्ली क्र. ५,
वाडिया हॉस्पिटलसमोर, पुणे ४११ ००२.
(दू. क्र. ४४८६०१५)











अनुक्रमणिका